## वरखेडकरांचीं पुस्तकें

प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| १ | संक्रमण | कादंबरी |
| २ | ध्येयाचा ध्यास | नाटक |

आगामी प्रकाशनें

| | | |
|---|---|---|
| ३ | अहंकार | कादंबरी |
| ४ | पूर्वग्रह | नाट्यकथा |

मुद्रक व प्रकाशक

**पां. ना. बनहट्टी**, बी. एस्सी.

नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर.

# निवेदन

आज नाटकासाठी रंगभूमि अस्तित्वांत नाही. आणि शिवाय नाटयवाचनाचा प्रकार अद्याप फारसा रूढहि झालेला नाही. ह्या दोन निराशाजनक कारणास्तव आज लेखक, आपली प्रतिभा नाटय-निर्मितीला अधिक समर्थ असतांनाहि, इतर ललित लेखनाचे प्रकार हाताळतो. पण माझा आशावाद चिवट आहे. रंगभूमि अस्तित्वांत नसलेली मला दिसते. पण असंख्य नाटयप्रेमीहि माझ्या डोळयासमोर उभे राहतात. बोलपटांनी नाटयकलेला अर्धचंद्र दिला हें खरें. पण बोलपट हें बहुजनसमाजाकरिता असल्यामुळे बुद्धिमन्तांची कलासवित तृप्त करण्यास ते असमर्थ ठरले आहेत. आणि आज पुन: नाटय-कलेच्या उत्कर्षाकरिता महाराष्ट्रांत धडपड सुरू झालेली आहे.

इतर ललित लेखनाच्या प्रकारापेक्षा वाचकाच्या दृष्टीने नाटक कांही बाबतींत अधिक श्रेयस्कर आहे. एक तर अवघ्या अडीच तीन तासांच्या अवधींत एक कथा वाचावयास मिळते व दुसरें म्हणजे मनःचक्षूंपुढे कल्पनासृष्टि उत्पन्न करण्याच्या बाबतींत नाटक अधिक प्रभावी ठरतें. सूचकतेमुळे कलाकृतीला विशेष सौंदर्य प्राप्त होत असतें. सूचकतेच्या साहाय्याने नाटककार नाटयलेखन करतो. नाटयनिर्माते त्या सूचनांनुरूप नाटयसृष्टि रंगभूमीवर उत्पन्न करतात. पण रसिक वाचक नाटक वाचतांना आपल्या कल्पनासृष्टींत प्रत्यक्ष नाटयनिर्मा-त्याचेंच कार्य करीत असतो. ह्याचमुळे नाटक इतर ललितलेखनाच्या प्रकाराहून अधिक प्रभावी आहे असें मी म्हणतों. शिवाय चार स्नेही एकत्र जमून नाटयवाचन केल्यास अधिक रसोत्कर्ष होतो. नाटय-

वाचनाच्या बैठकींत प्रत्ययाला येणारा आनंद मी वर्णन करण्यापेक्षा स्वतः वाचकांनीच प्रत्यक्ष अनुभवून पहावा.

गावोगावीं असलेलीं बहुतेक सर्वच नाट्यगृहें आज बोलपटांनी व्यापून टाकलीं आहेत. व नाट्याचार्य श्री. केशवराव दाते यांनी मुंबईच्या नाट्यसंमेलनप्रसंगीं म्हटल्याप्रमाणे 'आम्हास आज उभे राहण्यास जागाहि उरलेली नाही.' पुनः गावोगावीं नाट्यगृहें उभारलीं गेलीं तर आजहि अनेक नाट्यमंडळें उदयाला येतील. पण आजच्या परिस्थितींत गावोगावीं नाट्यगृहें उभारणें सहज नाही. व नाट्यगृहें उभारणें भरपूर भांडवल असल्याशिवाय शक्य नसल्यामुळे नाट्यप्रेमिकांचे मनोरथ 'उत्पद्यंते विलीयन्ते' असेच ठरण्याचा संभव जास्त !

असें असलें तरी कांही गोष्टी नाट्यकलेला अधिक अनुकूल आहेत. बोलपटांच्या इतकें अवाढव्य भांडवल नाटकाला लागत नाही. शाळाकॉलेजाच्या संमेलनप्रसंगी तर अवघ्या पांच पन्नास रुपयांत रंगभूमि उभारलेली आपण प्रत्यक्ष पाहतों. आजची परिस्थिति डोळ्यासमोर ठेवूनच मी हें नाटक लिहिलेलें आहे. संपूर्ण नाटकांत अवघे दोनच देखावे असून ते उत्पन्न करण्यांत लागणारी सामग्री मिळवणें फारसें अवघड जाणार नाही.

कै. किर्लोस्करांच्या वेळीं ज्याप्रमाणें रंगभूमि संक्रमणावस्थेंत होती त्याचप्रमाणें ती बहुतांशीं आजहि आहे. सद्यःस्थिति हलाखीची आहे. पण रंगभूमीच्या पुनरुज्जीवनाची व उत्कर्षाची आशाहि प्रज्वलित आहे. आता फक्त कै. किर्लोस्करांच्या सारखा चिवट आशावादी, दीर्घोद्योगी व प्रतिभासंपन्न नाट्यकार हवा आहे. कै. किर्लोस्करांच्या उदयकालीं रंगभूमीचें वातावरण फारसें सभ्य नव्हतें व कुलीन घराण्यांतील लोक रंगभूमीवर येण्यास धजावत नसत. आज तीच गत कुलीन

नाट्यप्रेमी स्त्रियांच्या बाबतींत आहे. कै. किर्लोस्कर स्वतः रंगभूमीवर अवतरले व कुलीनतेला पोषक असें वातावरण त्यांनी रंगभूमीवर उत्पन्न केलें. आज स्त्रियांच्या कुलीनतेला पोषक असें वातावरण रंगभूमीवर उत्पन्न व्हायला हवें आहे व कलेला अधिक उच्च स्वरूप येण्याकरिता कुलीन स्त्रियांनी रंगभूमीवर येणेंहि आवश्यक आहे.

पुरुष स्त्रीभूमिका करीत असतांना लिहिलीं गेलेलीं बहुतेक सर्वच नाटकें अशीं आहेत की त्यातील नाट्यप्रसंग रंगभूमीवर वठवण्यास कुलीन स्त्री धजावणार नाही. श्री. वर्तक व नाट्याचार्य श्री. केशवराव दाते यांनी या बाबतींत सौ. ज्योत्स्ना भोळे, सौ. वर्तक व सौ. लीला चिटणीस यांच्या सहकार्याने नाट्यमन्वन्तर घडवून आणलें. पण तें मन्वन्तर कांही काळाने संपुष्टांत आलें व आज निदान इकडे नागपूर प्रांतांत तरी स्थिति पूर्ववतूच आहे. कुलीन स्त्रियांस रंगभूमीवर काम करतांना कुठेहि अवघडल्यासारखें वाटूं नये, कुठेहि औचित्यभंग झाल्यासारखा वाटूं नये व स्वाभाविकता तर कायम राहावी असेंच वातावरण उत्पन्न करण्याचा हेतु समोर ठेवून मी हें नाटक लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. गेल्या वर्षी ऑगस्ट महिन्यात हें नाटक लिहिलें गेलें, येथील अभिनव नाट्यमंदिराच्या कार्यकारी मंडळीने व इतर रसिकानी तें वाचलें व वरील हेतूला मूर्त स्वरूप आणण्यासाठी बरेच प्रयत्नहि केले. प्रस्तुत नाटकाच्या प्रयोगार्थ दोन स्त्रिया व एक लहान मुलगी मिळणें आवश्यक आहे. हवा असलेला स्त्रीनटसंच जमत यावा पण कार्यारंभ होण्यापूर्वीच तो विघटित व्हावा असाच अनुभव अभिनव नाट्यमंदिराला आला. या प्रांतांत उत्साही नाट्यप्रेमी स्त्रिया आहेत; रंगभूमीवर येण्यास त्या तत्वतः अनुकूल आहेत पण तेंच कृतींत उतरविण्याचें धैर्य अद्याप त्यांच्यांत यावयाचें आहे. आणि हें घडवून आणण्याचे कामीं अभिनव नाट्यमंदिर अत्यंत आस्थेने कार्य करीत आहे आणि त्याबाबतींत लवकरच यश येईल असा आत्मविश्वास आहे.

मला हें नाटक लिहिण्यास श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी प्रवृत्त केलें. १९४१ सालच्या मुंबईच्या नाट्यसंमेलनाकरिता नाटकाची आवश्यकता होती, व संमेलनाच्या कार्यकारी मंडळाजवळ एकहि चांगलें नाटक आलें नव्हतें. श्री. माडखोलकरांना हें कळतांच त्यांनी मला नाटक लिहून पाठविण्यास अतिशय आग्रहपूर्वक सांगितलें. त्याच सुमारास मी प्रस्तुत नाटकांतल्या नायकाची जीवनकथा 'अहंकार' कादंबरींतून चित्रित करीत होतों.

वैभवाचें प्रतीक असलेली एक भव्य इमारत असते. अनिरुद्धाच्या—कथानायकाच्या, वडिलांनी लुबाडलेल्या धनाने ती उभारली गेली असते.

ती इमारत अनिरुद्धाच्या आजोबांच्या हयातींतच उभारली गेली. शेवटीं शेवटीं म्हाताऱ्याला वैभव पहायला मिळालें होतें. मरायची वेळ आली तेव्हा म्हाताऱ्याचा प्राण जातां जाईना. निदान आपल्या अस्थि तरी इथेच, ह्या इमारतींतच राहाव्या ही म्हाताऱ्याची मरतांनाची इच्छा. पण घरांत अस्थि ठेवणें महान् अशुभ असतें. ते वारल्यावर अनिरुद्धाच्या वडिलांनी त्यांच्या अस्थि इमारतीच्या तिसऱ्या मजल्यावरील गच्चीवर तुळशीवृंदावन बांधून त्यांत ठेवल्या. एका अर्थाने अस्थि घरांत नव्हत्या !

आणि त्या दिवसापासून एका विलक्षण भीतीने अनिरुद्धाच्या आईच्या अंतःकरणांत ठाणें मांडलें. सत्यानाशाचीं विचित्र स्वप्नें तिला भेडसावूं लागलीं.

इमारतीचा इतिहास व आईची विलक्षण भीति ह्याचा अनिरुद्धाच्या संस्कारक्षम मनावर फार परिणाम झाला. एकदा ती वैभवाची प्रतीक असलेली इमारत नष्टावस्थेस पोचल्याचें—घराण्याच्या सत्या-

नाशाचें स्वप्न---अनिरुद्धाला पडलें आणि त्याच स्वप्नाची कृष्णछाया त्याच्या सर्व जीवनावर पडली.

त्याच्यावर अपयश व आपत्ति ओढवल्या. आईची शक्ति खचत खचत त्याच्या डोळ्यासमोर तिचा प्राण गेला. शरयू नांवाच्या मुलीवर त्याने प्रेम केलें. पण अहंकार व अविवेक यांमुळे त्याच्या हातून शरयूच्या कोमल अंत:करणावर तीव्रतर आघात झाला. अनिरुद्धाला आपली चूक कधीच सुधारतां आली नाही. शरयूचें जीवन सर्वस्वीं काळवंडून गेलें होतें. आणि एकदा आजारी पडल्यावर तिने स्वत:ला सावरण्याचा यत्किंचित्हि प्रयत्न केला नाही.

आई वारली, शरयू जग सोडून गेली आणि तात्यांच्या अहंकारी व आततायी स्वभावामुळे अनिरुद्धाच्या भावांवरहि घर सोडण्याची वेळ आली. पुढे त्या भकास वातावरणांत तात्यांनाहि रहावेना. तेहि घर सोडून गेले. आणि घराणें पूर्णपणें विघटित झालें.

त्या प्रचंड हवेलींत आता अनिरुद्धाखेरीज दुसरें कोणीहि उरलें नाही. आणि त्याला ती निर्जन हवेली अतिशय भयाण व भेसूर भासूं लागली. भुतांनी अक्षरश: इमारतींत व अनिरुद्धाच्या अंत:करणांत थैमान घातलें. आणि एक दिवस—नव्हे एका रात्रीं, अनिरुद्धाने त्या इमारतीस रामराम ठोकला. त्या पूर्वपरंपरादूषित वातावरणांतून तो मोकळ्यांत येत होता.

सर्वत्र अंधार पसरला होता. आणि त्या भेसूर अंधारांत ती भव्य इमारत उभी होती.

असें ‘अहंकार’ कादंबरीचें कथानक होतें. श्री. माडखोलकरांनी नाटक लिहिण्यास सुचविलें तेव्हा तें पूर्ण होत आलें होतें. नाटकाकरिता मला कथानक हवें होतें. ‘अहंकार’ कादंबरीचें कथानक पूर्ण झाल्याबरोबर माझ्या डोळ्यासमोर एक प्रश्न उभा राहिला.

ज्याचें शीघ्रसंवेदनाग्राही मन परिस्थितीच्या तीव्रतर प्रत्याघातामुळे पूर्णपणें विघटित झालें त्याच्यासमोर कोणत्या प्रकारचें भवितव्य उभें राहील? नवीन परिस्थितींत सुद्धा त्याचें विघटित अंतःकरण कितपत टिकाव धरूं शकेल?

ह्याच प्रश्नाने माझें मन पूर्णपणें व्यापून टाकलें. अखेर नाटकासाठी नवें कथानक शोधण्याचा प्रयत्न सोडून देऊन वरील प्रमेयावरच अनिरुद्धाची पुढील जीवनकथा चितारण्याचें मी ठरविलें व एक स्वयंपूर्ण कथानक तयार केलें.

अनिरुद्धाला फक्त मी वेगळ्या वातावरणांत आणून सोडलें. आनंद, शरद्, कुंदा व तिच्या घरची मंडळी यांनी एक विशिष्ट वातावरण अनिरुद्धाकरिता उत्पन्न केलें. एवढें झाल्याबरोबर कथानकाला आपोआपच गति मिळाली. थॅकरेच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे लेखणीचा अनिरुद्ध संचार सुरू झाल्यावर माझा हात तिला रोखण्यास असमर्थ होता. आणि तीं पात्रें एकत्र आणून सोडल्यावर त्यांचें भवितव्य निश्चित करणेंहि माझ्या हातचें नव्हतें. फार तर काय, त्यांचें भवितव्य मलाच थोडेंबहुत अज्ञात होतें.

शक्य तितक्या अल्पावधींत नाटक लिहून पूर्ण होणें आवश्यक होतें. आणि प्रत्यक्ष नाटक लिहिण्यास सुरवात केल्यावर अवघ्या दहा दिवसांत मी तें पूर्ण करूं शकलों. जरी नाटक मुंबईच्या नाट्यसंमेलनाकरिता इतक्या तातडीने लिहिलें होतें तरी तेथे ह्या नाटकाचा प्रयोग होण्याचा योग नव्हता. संमेलनाच्या कार्यकारी मंडळाने श्री. मामासाहेब वरेरकर यांच्याकडून विनंति करून प्रयोगार्थ आधीच नाटक लिहून घेतलें असल्यामुळे अर्थातूच प्रस्तुत नाटक मागे पडलें. आणि आज सुमारें एक वर्षानंतर तें प्रकाशित होण्याचा योग येत आहे. वस्तुतः 'अहंकार' कादंबरी ह्या नाटकापूर्वी प्रसिद्ध व्हायला हवी होती.

लिहिणें लेखकाच्या हातचें असतें पण प्रकाशनाकरिता त्याला योगायोगा-वर विसंबून राहावें लागतें. आणि तो योगायोग जमेपर्यंत कथानाय-काच्या जीवनवृत्तांताचा पूर्वार्ध अप्रसिद्ध राहील. त्याला इलाज नाहीं. तरी पण प्रस्तुत नाटकांतील कथानक स्वयंपूर्ण आहे व तें पूर्वार्धावाचून पूर्णपणें कळूं शकेल.

प्राध्यापक श्री. श्री. ना. बनहट्टी यांनी अकृत्रिम आपुलकीने मला अतोनात साह्य केलें. व नाटक रंगभूमीवर आणण्याचे बाबतींत अतिशय मदत केली व करीत आहेत, त्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहीन. प्राध्यापिका सौ. कुसुमावतीबाई देशपांडे यांचा मी विद्यार्थीच आहे. केवळ विद्यालयीन अभ्यासांतच नव्हे तर लेखनाचे बाबतींतहि त्यांनी तत्परतेने मार्गदर्शन केलें. एवढेंच नव्हे तर ‘यशाच्या पाठीमागे अपरिहार्यपणें येणाऱ्या तारुण्यसुलभ आत्मसंतुष्टतेपासून’ मला अलिप्त राखण्यासाठी त्या वेळोवेळीं इषाराहि देत आल्या. त्याबद्दल मला सदैव कृतज्ञताच वाटेल. श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी हें नाटक लिहिण्यास मला प्रवृत्त केलें, नाटक वाचून त्याचें मनःपूर्वक कौतुक केलें व शक्य तितकें साह्य केलें. त्यानी माझ्यावर उपकारांचे बरेच मोठें ओझें करून ठेवलें आहे. या नाटकाच्या निमित्ताने माझा बऱ्याच नाट्यप्रेमी लोकांशीं परिचय झाला व त्यांच्याकडून बऱ्याच उपयुक्त सूचना मिळाल्या. सुप्रसिद्ध नाटककार श्री. वासुदेवराव भोळे यांनी माझें नाटक वाचून त्याची प्रशंसा केली व पुष्कळ उपयुक्त सूचना केल्या. पूर्वीच्या कादंबरीचेंच ‘अहंकार’ हें नांव मी प्रस्तुत नाटकालाहि योजिलें होतें. पण तें नांव प्रस्तुत नाटकाला शोभत नसल्याचें श्री. वासुदेवराव भोळयांनी माझ्या निदर्शनास आणून दिलें व अखेर मी नाटकाचें नांव बदललें. त्याचप्रमाणे श्री. शं. बा. शास्त्री यांनीहि मला कांही उपयुक्त सूचना केल्या. उभयतांचा मी अत्यंत

आभारी आहें. बेबीच्या तोंडी कै. भा. रा. तांबे यांच्या शिशुगीतांतील कांही ओळी घातल्या आहेत. व कुंदाच्या तोंडीं श्री. आ. रा. देशपांडे यांच्या 'फुलवात'मधील भावगीतांतील कांही ओळी घातल्या आहेत. उभयता कवींचा मी ऋणी आहें.

ता. १-१०-४२
लाल बंगला,
धरमपेठ, नागपूर.

व. शा. वरखेडकर

## प्रमुख पात्रें

अनिरुद्ध : एक तरुण तत्त्वज्ञ.

आनंद }
शरद् } अनिरुद्धाचे तरुण स्नेही.

डॉ. साठे ऊर्फ काकासाहेब : अनिरुद्धाचे वयस्क स्नेही व चाहते.

कुंदा : डॉ. साठ्यांची तरुण मुलगी.

आई : डॉ. साठ्यांची पत्नी.

बेबी : कुंदाची धाकटी बहिण.

चंदू : अनिरुद्धाचा गडी.

स्थळ : महाराष्ट्रांतील कोणतेंही शहर.

अंक १ ला }
अंक ५ वा } वर्तमानपत्राच्या कचेरींत रूपान्तर केलेला अनिरुद्धाच्या घरांतील दिवाणखाना.

अंक २ रा }
अंक ३ रा }
अंक ४ था } डॉ. साठे यांच्या बंगल्याचा अद्ययावत् व कलापूर्ण सजावटीचा दिवाणखाना.

काल : १९४०-४१ चा

# १

[ प्रशस्त दिवाणखान्याचें वर्तमानपत्राच्या कचेरींत रूपांतर केलेलें आहे. मध्यभागीं एक मोठें टेबल असून त्यावर लेखनसामग्री, कांही वर्तमानपत्रें व बरीचशीं पुस्तकें अस्ताव्यस्त पडलेलीं आहेत. भिंतीच्या बाजूने मोठालीं पुस्तकें भरलेलीं कपाटें आहेत. त्याच दिवाणखान्यांत आणखीही टेबलखुर्च्या असून त्यांच्या ठेवणींत बराच अस्ताव्यस्तपणा दिसून येईल. दिवाणखान्याच्या उजव्या हाताचें दार अनिरुद्धाच्या खाजगी खोलीचें असून डाव्या हाताचें दार आनंदाच्या खोलीचें आहे. डाव्या हाताला असलेलें दुसरें दार आंतील छापखान्याचें आहे.

मधल्या टेबलावर अनिरुद्ध निरनिराळे ग्रंथ चाळून एका प्रबंधासाठी टिपणें तयार करीत बसलेला असतो. स्वारीला एक भयंकर व्यसन जडलेलें आहे. ते म्हणजे व्यासंग करीत राहण्याचं! पुस्तकाशिवाय त्याला वेळ काढणं अशक्य व्हावं अशी त्याची स्थिति आहे. त्याची मूळची आंगकाठी बऱ्यापैकी असली तरी

आता अतिरिक्त श्रमांच्यामुळे व श्रमपरिहाराकरितां बेसुमार चहापान व धूम्रपान केल्यामुळे फार खालावलेली आहे.

आनंदाची सर्वत्र देखरेख चाललेली आहे. आनंद आंगकाठीने चांगला उंचापूरा व धष्टपुष्ट असून गुंडामध्ये शोभून जाईल इतका राकट आहे. फक्त साहेबी पोषाख चढवल्यामुळे त्याच्या शरीराचा पहेलवानी धाट जरा लपलेला दिसतो. स्वभाव अतिशय घालमेली असून उत्साह जसा कांही उताला चाललेला आहे. 'चंदू, ए चंदू, चंद्या' म्हणून ओरडतो. गडी प्रवेश करतो.]

चंदू : काय सायब ?

आनंद : काय करत होतास ?

चंदू : मी व्हय ? तुमी म्हनाले व्हते म्हून शान--

आनंद : बरं तें जाऊं दे. गणपतराव आहेत की गेले ?

(चंदू गणपतरावांना पहायला छापखान्याच्या दाराने जाऊं लागतो.)

आनंद : हें बघ चंदू, गणपतरावांना म्हणावं की साडेपांच वाजून गेले. आता काम बंद करा अन् जा घरीं.

(चंदू छापखान्याच्या दाराने आत जातो. आनंद लगबगीने अनिरुद्धाच्या टेबलाजवळ येतो.)

आनंद : समजलं अनिरुद्ध, आपलं आजचं कचेरीचं काम आटोपलं.

अनिरुद्ध : चला बरं झालं. आता मी जातो आंत आणि लागतों त्या प्रबंधाच्या अभ्यासाला. असा जीवनक्रम आवडतो मला. अहोरात्र आपल्या कामांत दंग. सुखाच्या पाठीमागे मुळीच न धांवणारे माझ्यासारखे किती लोक आढळतील ?

आनंद : पण खूप कीर्ति मिळून तूं अद्वितीय थोर माणूस झाल्याशिवाय मी स्वस्थ बसणार नाही आणि तुलाहि स्वस्थ बसूं देणार नाही.

अनिरुद्ध : मला तर खूप काम करण्याचं व्यसनच जडलं आहे. त्या व्यसनापायींच मला सगळ्या मानसिक व्यथांचा आणि शारीरिक व्याधींचा विसर पडतो. एकदा आपल्या कामांत मन एकाग्र केलं की बस्स ! मग कशाचं म्हणून दुःख जाणवायला नको. पण एकदा लेखन-वाचनांत गर्क झाल्यावर मग कुणी माझ्या तंद्रीचा भंग केलेला मला सहन होत नाही. चिडून गेल्यासारखं होतं !

आनंद : रात्रीं सातला तुला नगरभवनांत व्याख्यान द्यायला जायचं आहे. इतक्यांत त्या प्रबंधाच्या अभ्यासाला लागूं नकोस म्हणजे मग तुझ्या तंद्रीचा भंग होण्याची भीति नाही.

अनिरुद्ध : नगरभवनांत व्याख्यान द्यायला जायचं आहे ? रोज संध्याकाळीं कुठेना कुठे व्याख्यान देण्याकरितां आमंत्रण ठेवलेलं. दिवसभर इथे कचेरीच्या कामांत वेळ जातो. संध्याकाळ झाल्यावर त्या प्रबंधाच्या उद्योगाला लागावं म्हणून म्हटलं तर रोजचं व्याख्यानाचं आमंत्रण ठेवलेलं. तें कांही नाही, मी येणार नाही म्हणून कळवून दे.

आनंद : हें बघ अनिरुद्ध, असं करून चालणार नाही. भाषणं करणं बंद करण्याची तर गोष्टच सोड मी तर म्हणतों की तूं आता व्याख्यानं देण्याकरता दौरा काढ. लवकर प्रसिद्धि मिळवण्याचा मार्ग आहे तो.

अनिरुद्ध : छान, सगळं प्रसिद्धि मिळवण्याकरता करायचं !

आनंद : अर्थात् आणि तुला ह्या प्रांतांतला प्रमुख राजकीय पुढारी बनवणं हें आपलं ध्येयाकडचं पहिलं पाऊल. तें कांही नाही, आज तूं व्याख्यान देच. सरकारच्या युद्धहेतूवर टीका करायची आहे.

अशी सडकून टीका कर की लोकांचीं मनं खवळून गेलीं पाहिजेत आणि सरकारची चित्तवृत्ति बावरून गेली पाहिजे. आपल्या वर्तमान पत्रांतून लिहितोच आहेस. आता व्यासपीठावरून सरबत्ती सुरूं कर. आता श्रमांकरतां माघार नको घेऊंस.

अनिरुद्ध : छे छे, श्रमांकरिताच काय पण आता मी कशाकरता सुद्धा माघार घ्यायचा नाही. ध्येयाच्या मागे बेभान होऊन धावायला किंवा स्वतःचा सर्वस्वी सत्यानाश झाला तरी त्याची पर्वा न करायला अगदी मोकळा आहे मी ! न मला संसाराचे पाश न कांही. अगदी स्वतंत्र आहे मी ! बरं करीन मी भाषण. कळवून दे त्या प्रमाणं. कितीला सातला जायचं आहे, नाही का ? अजून पुष्कळ वेळ आहे. तोंपर्यंत पुष्कळ लेखनवाचन होऊं शकेल. कोणी गप्पा छाटायला न येवो म्हणजे झालं. एकतर चारचौघांत बसून मौजेने गप्पा मारणं मला जमत नाही. आणि गप्पा चालल्या असतांना भलता विषय निघाला की झालं ! एकदा मन भडकलं म्हणजे मग तें लवकर स्थिर होत नाही आणि मग हातून कामहि होत नाही.

आनंद : तो शरद् आताशा रोज तुला भेटायला म्हणून संध्याकाळीं इथे चक्कर मारून जातो. तुझ्याशीं गप्पा मारायला जसा कांही हपापल्यासारखा झाला आहे. आणि गप्पा कोणच्या मारायच्या असतात ? आपण कॉलेजांत असतांना कोणकोणत्या मुलींच्या मागे लागलों होतों ? प्रत्यक्ष पाहिलेल्या मुलींतली सर्वांत सुंदर कोण ? लेकाचं लग्न झालंय पण ह्या प्रणयपंडिताचं मन त्याच विषयाभोवती घुटमळतं आहे.

अनिरुद्ध : मी त्याला कितीदा तरी सांगितलं की असले विषय माझ्यासमोर काढत जाऊं नकोस.

आनंद : तें कांही नाही, एकदा त्याची चांगली खरडपट्टी काढून त्याला ताळ्यावर आणावं लागेल. त्याला वाटतं की प्रेमाच्या

गुलगुलीत विषयानं सगळयांचींच मनं आनंदाने बहरून जातात. त्याला स्वत:ला जन्मांत कधी कशाची महत्वाकांक्षा नव्हती. आणि तुझ्याहि महत्वाकांक्षा त्याला तुच्छ वाटतात. तुझी भेट होत नाही म्हणून आता तुझ्या कामांत मोडता घालायचा आणि तुला कामापासून परावृत्त करण्याचा त्याने चंग बांधला आहे.

अनिरुद्ध : ह्या सगळया अडथळयापासून मला वाचवण्याची कामगिरी मी तुझ्यावर सोपवली आहे. बरं जातों मी आंत.

आनंद : थांब न जरा, चहा घे अन् मग जा आंत.

अनिरुद्ध : तयार झाला म्हणजे आंत पाठवून दे.

(बाहेरून बेबीचा आवाज ऐकूं येतो. 'चंदू, आंत जा अन् साहेबांना म्हणावं की कुमारी सुषमाताई साठे तुम्हाला भेटायला आल्या आहेत.')

अनिरुद्ध : यावं सुषमाताई !

(बेबी प्रवेश करते. तिचें वय दहा अकरा वर्षांचें असून परकर नेसली आहे. पोषाखाच्या बाबतींत अतिशय दक्ष. घटकेंत अतिशय खेळकर बनायचं तर घटकेंत प्रौढीचे, शांतपणाचे व गांभीर्याचे भाव आणायचे असा स्वभाव. तिला वाटतं की आता आपण मोठे झालों. तिला बेबी न म्हणतां कोणी सुषमाताई म्हटलं म्हणजे ती एकदम खूष होते.)

बेबी : नमस्कार अनिरुद्ध.

अनिरुद्ध : (तिच्या नमस्काराकडे लक्ष न देतां) काय कोणीकडे आलांत सुषमाताई ?

बेबी : अगोदर नमस्कार करा ! कुणी नमस्कार केला म्हणजे उलट आपणहि नमस्कार करायचा असतो.

अनिरुद्ध : चुकलों हं. माफ करा. (पद्धतशीर तऱ्हेने हात जोडून) नमस्कार! कां, कांही निरोप वगैरे आणला आहे की काय?

बेबी : कुणी आपल्या इथे भेटीला आलं म्हणजे या, बसा, असं म्हणून बसायला खुर्ची द्यायची असते. तुम्ही अजून मला बसायला खुर्ची दिली नाही आणि बसा म्हणून म्हटलंहि नाही.

(आनंद तिला बसायला खुर्ची पुढे करतो.)

आनंद : (अतिशय अदबीने) बसा न! (बसते.)

बेबी : (आनंदाला) ती दुसरी खुर्ची घ्या आणि अशी माझ्यासमोर ठेवा. (आनंद त्याप्रमाणे करतो. अनिरुद्धाला--) बसा न. (अनिरुद्ध बसतो.)

अनिरुद्ध : बोला!

बेबी : कशी काय आहे तुमची प्रकृति?

अनिरुद्ध : थँक्स! बरी आहे.

बेबी : मला नाही खरं वाटत. तुम्ही खूप खूप अभ्यास करतां म्हणे.

अनिरुद्ध : कोण म्हणे?

बेबी : मी सांगू का तुम्हाला, फार अभ्यास करूं नये. म्हणून तर मी अभ्यास फारसा करीत नाही. खूप खेळावं म्हणजे आपण आनंदी राहतों. चला न आमच्या इथे म्हणजे आपण कांही तरी खेळूं.

अनिरुद्ध : आणखी कधी तरी येईन.

बेबी : तें कांही नाही. आता आलं पाहिजे तुम्हाला. काकांनी बोलावलं आहे तुम्हाला.

अनिरुद्ध : पण काकांना म्हणावं सवडीनं एखादे दिवशीं येईन.

बेबी : चला न असं काय करतां! मी तुम्हांला आता माझ्या-

बरोबर आमच्या घरीं नेलं तरच कुंदाताई मला गाणं शिकवील. नाही तर नाही शिकवायची.

अनिरुद्ध : आणि आज तुझ्या बरोबर कुंदा नाही आली ?

बेबी : आई आणि काका फिरायला गेले आहेत म्हणून तिला घरीं राहावं लागलं.

अनिरुद्ध : वा, काकांनी बोलावलं आहे म्हणून म्हणालीस आणि काका तर बाहेर फिरायला गेले आहेत. खोटं बोलतेस कां ?

बेबी : मी नाही हो खोटं बोललें. कुंदाताईच म्हणाली की मी बोलावलं म्हणून नको सांगूस, काकांनी बोलावलं आहे म्हणून सांग.

अनिरुद्ध : कुंदाताईला म्हणावं की माफ कर. मला खरंच वेळ नाही. बरं आनंद, आता मी जातों आंत. चहा झाला म्हणजे पाठवून दे. आपल्या सुषमाताईनाही एक कप चहा दे.

बेबी : मला नको तुमचा चहा. मी येवढ्या ह्याने तुम्हाला बोलवायला आले तर तुम्ही आपलं नाही नाहीच म्हणतां. चला न, असं काय करतां ?

अनिरुद्ध : उद्या अगदी जरूर जरूर येईन अं. कुंदाला म्हणावं माफ करा मला.

बेबी : मला राग आलाय तुमचा. आणि मी ताईलाहि सांगणार आहे की तूं अनिरुद्धांशीं मुळीच बोलूं नकोस. अगदी वाईट आहेत ते. मग नाही येत तुम्ही ?

अनिरुद्ध : उद्या जरूर येईन अं.

बेबी : (रागावून) बरं नका येऊं. आता कधी मी तुमच्याशीं बोलायचीच नाही. (निघून जाते.)

आनंद : तूं कुंदाकडे जायचं बंद केलंस म्हणून कुंदाचं रोज इथे तुला भेटायला येणं सुरू झालं. आज तिला यायला मिळालं नाही म्हणून

तिने बेबीला निरोप घेऊन पाठवलं. मी तुला अगदी नक्की सांगतों की बेबी घरीं पोचल्याबरोबर कुंदा काय वाटेल ती सोय करील आणि इथे तुला भेटायला येईल.

अनिरुद्ध : म्हणजे झालंच. आजहि संध्याकाळचा वेळ फुकट जायचा !

आनंद : मला तुझा स्वभाव ठाऊक आहे. इतका कुरकुरतोस पण ती आली म्हणजे तुझ्याच्याने भीड मोडवत नाही. हळूं हळूं तूं तिच्या पाशांत पडणार व मग तुझा निश्चय कुठल्याकुठे पळणार. आणि थोडयाच दिवसांत त्या शरदप्रमाणे संसारी अन् घाण्याचा बैल बनशील झालं. तुझ्या जागीं मी असतों तर प्रकरण असं वाढूंच दिलं नसतं.

अनिरुद्ध : खरंच माझ्याने तिचं मन मोडणं होत नाही. आज माझ्या डोक्यांत खूप कल्पना घोळून राहिल्या आहेत त्या लिहून काढल्या-शिवाय चैन पडायचं नाही. म्हणून म्हणतो की कुंदाहि जरी आली तरी तिला वाटेला लाव. मात्र तिला वाटेला लावतांना अतिशय सभ्य अन् सौम्य भाषा वापर. तिला म्हणावं की अनिरुद्धावर कृपा कर, दया कर, अन् त्याचा वेळ घेऊं नकोस. माझी त्याप्रमाणे नम्र विनंती असल्याचं सांग.

आनंद : सगळी कटु कामगिरी करण्याचा मक्ता माझ्याकडे ! ठीक आहे. कुंदा आणि शरद् रागावलेच तर माझ्यावर रागावतील. रागावूं देत. मला त्याचं कांही नाही.

अनिरुद्ध : तुला तें साधतं म्हणून म्हणतों. (ग्रंथ व टिपणं गोळा करून आंत जाऊं लागतो.) चहा—सिगारेट पाठव बोवा लवकर. बरंच थकल्यासारखं वाटतं आहे.

आनंद : चंदू, ए चंदू, चंद्या—( चंदू येतो. ) केलीस छाप-खान्याचीं दारं बंद ! ( चंदू मान डोलावतो ) आता हीं इथलीं सगळीं टेबलं साफ करायचीं. खोल्या झाडून काढ. अनिरुद्धांची खोली इतक्यांत नको झाडूं. तुझ्या झाडण्यामुळे त्रास होईल त्यांना. ( चंदू केरसुणी आणायला जाऊं लागतो ) बरं, झाडझूड मग कर. चहाची तयारी कर बरं. स्टोव्ह पेटव अन् दोन कप चहा ठेव. आणि मग सायकलवर जाऊन झटपट सिगारेटचं पाकीट घेऊन ये. हे घे पैसे. ( पैसे चंदूच्या हातावर ठेवतो. इतकीं कामें भराभर सांगितल्यामुळे चंदू गडबडून जातो. ) अरे पाहात काय राहिलास. आंत जा अन् स्टोव्ह पेटव अगोदर.

( चंदू जातो. आनंद शीळ घालूं लागतो. इतक्यांत शरद् येतो. शरद् अनिरुद्धाच्याच वयाचा असून अगदी किरकोळ शरीरयष्टीचा आहे. स्वारी विवाहित असल्यामुळे व विवाह होऊन बराच काळ लोटला असल्यामुळे पोषाखाच्या बाबतींत मुळीच दक्ष नसते. अन् कारकुनी पेशामुळे गबाळग्रंथी स्वरूप प्राप्त झालेलं आहे. नाकांत नस कोंबण्याचं व्यसनहि जडलेलं आहे. त्याला दुसरंहि एक वाईट व्यसन आहे. तें म्हणजे आपल्या प्रत्येक वाक्याला विनोदी समजून हसण्याचं. त्याची भूमिका गंभीर स्वरूपाची असली तरी त्याच्या हेतूंतलं गांभीर्य कांही कुणाच्या लक्षांत यायचं नाही. )

शरद् : ( आनंदाला ) जय गुरुमाऊली—जय सच्चिदानंद, बोलो भारत माताकी जय. ( नमस्कार करतो व हसतो. ) आज तरी होणार आहे का अनिरुद्धाचं दर्शन ? अरे, सुंदर मुलींचं दर्शन होण्या-करता मी मारले नसतील इतके चक्कर अनिरुद्धाच्या दर्शनाकरता मारून चुकलों. ( हसतो. )

आनंद : अरे चंदू, एक कप चहा आणखी ठेव.

शरद् : मी कांही चहा प्यायला आलेलों नाही. माझं लग्न झालेलं आहे. ऑफिसांतून घरीं आल्याबरोबर बायको चहा देते मला. आज मी अनिरुद्धाला भेटणार अन् त्याला स्पष्टपणें सांगणार की सगळा वेळ असं कामाला जूंपून घेणं चांगलं नाही म्हणून. सदा श्रमांचा अतिरेक करणं म्हणजे काय ? प्रकृतीची धूळधाण दुसरं काय ! अरे लिखोगे पढोगे तो होंगे खराब. खेलोगे कूदोगे तो होंगे नबाब. (हसतो)

आनंद : पण अनिरुद्धाला नबाब व्हायचं नाही. दहा वर्षांचा तुझा अन् त्याचा स्नेह आहे पण तूं त्याला अद्याप ओळखलं नाहीस. तसा जीवनक्रम म्हणजे चार उडाणटप्पू मित्र गोळा करायचे आणि अश्लील कोटयाप्रतिकोटया करीत वेळ घालवायचा !

शरद् : कितीदा ऐकवणार आहेस हें ?

आनंद : तुझ्या अन् अनिरुद्धाच्या मनोवृत्तींतला फरक मला तुझ्या नजरेला आणून द्यायचा आहे.

शरद् : तो तर मला आधीच माहीत आहे. मी आपल्या धंद्यांतून बनेल तितकी देशभक्ति करतों. तर तो आपल्या देशभक्तींतून बनतील तितके धंदे करतो. (हसतो) मोठेपणाची हाव सुटली आहे त्याला!

आनंद : पुन्हा तूं आपल्या बोलण्यांतून अनिरुद्धाबद्दल अज्ञान प्रगट केलंस.

शरद् : ज्ञान अन् अज्ञान जाऊं दे. माझा विनोदच मुळी तुला कळला नाही. सगळ्यांनाच नाही कळायचा तो. (हसतो)

आनंद : मला तुझा विनोद न कळला तरी चालेल. पण अनिरुद्धाचं खरं स्वरूप तुला एकदा नीट कळायला हवं.

शरद् : चालूं दे तुझं पुराण मी वाती वळतों तोंपर्यंत. (हसतो)

आनंद : आणि जेव्हा तुला हें मूर्खासारखं हसत सुटण्याचं व्यसन जडत होतं तेव्हा अनिरुद्धाला भयंकर मनोव्यथा होती ह्याची तुला जाणीव आहे ?

शरद् : अनिरुद्धाला ? त्याचे सगळे व्यवहार अगदी संथपणे चाललेले दिसत होते. डोकं ठिकाणावर, म्हणजे खांद्याच्यावर होतं. आणि मनोव्यथाच असली तर अविवाहित तरुणांना असते तीच असेल. अरे बाबा, ब्रह्मचारी राहणं ही काय सुखाची गोष्ट आहे ? पण तुम्ही लोक मनोव्यथा होती अन् आहे असं रडगाणं गात बसाल पण योग्य दिशेला मोर्चा वळवायचा तें मात्र कधी करणार नाही.

आनंद : अनिरुद्धाच्या जीविताबद्दल कांहीच माहीत नसल्यासारखं तूं बोलशील असं नव्हतं वाटलं मला.

शरद् : पण तुझ्याप्रमाणे येवढयाश्या गोष्टीचा भयंकर बाऊ करायचा स्वभाव नाही माझा. गालावर मुरमाची पुटकुळी उठली तर आम्ही म्हणूं की तारुण्यांत हें असं व्हायचंच. तर तुम्ही त्याच गोष्टीचा भयंकर गाजावाजा करून लैंगिकशास्त्रावरचीं पुस्तकं चाळत बसाल.

आनंद : हे बघ, अशा प्रकारचा विनोद तूं आपल्या इतर मित्रमंडळींच्या अड्डयावर करत जा. इथे फुकट जातो तो. ( चंदू चहा आणून देतो. व चहा सिगारेट घेऊन अनिरुद्धाच्या खोलींत जातो. )

शरद् : सांग न, अशी कोणती मनोव्यथा होती अनिरुद्धाला ?

आनंद : त्याचं सगळं जीवित समजून घ्यायला हवं. त्याच्या मनाची घडण कशी बनत गेली हें तुझ्या लक्षांत यायला हवं. तूं त्याच्या महत्वकांक्षांना तुच्छ लेखतोस व स्वतःप्रमाणे खुशालचेंडू बनवण्यासाठी धडपडतोस. त्याने चारचौघांत येऊन गप्पा मारत बसावं अशी तुझी अपेक्षा आहे. पण तूं अनिरुद्धाच्या मनाचा नीट छडा लावून घेशील तर तुला हें पटेल की अनिरुद्धाचं हित व सुख कामाचे प्रचंड व्याप उत्पन्न करून त्यांत गढून जाण्यांतच आहे. कर्तृत्वाच्या पाठीमागे लागण्यांत दुहेरी फायदा होणार आहे त्याला. इकडे कीर्ति व मोठेपणा मिळेल आणि शिवाय कोणतीच मनोव्यथा जाणवणार नाही.

शरद् : मनोव्यथा! मनोव्यथा! मनोव्यथा! आपल्याला ढेकणांचं चावणं समजतं पण मनोव्यथा ही काय चीज आहे हें नाही बोवा कळत. हं, येवढं मात्र कळतं की माझ्यासारखं वागावं म्हणजे मनोव्यथा टिकून रहायची नाहीं.

आनंद : तुझी गोष्ट वेगळी होती. अनिरुद्धाची राहती इमारत, घरांतली स्थिति, त्याच्या आईचा मृत्यु व त्या शरयू प्रकरणाचा शोककारक अंत ह्या सर्व गोष्टींनी त्याचं अंतःकरण घायाळ केलं. त्याच वेळेला अनिरुद्धाच्या डोक्यांत ध्येयवादाच्या कल्पना घोळत होत्या. तुझ्याजवळ त्याने त्या बोलून दाखवल्या. आणि तूं स्थानीं अस्थानीं त्यांची कुचेष्टा करून त्याला आणखी व्यथित केलंस. काय करील बिचारा ? आजच्या प्रमाणे तेव्हा त्याने आपली योग्यता सिद्ध केलेली नव्हती. मुकाट्याने तुझा उपहास सहन करण्यावाचून त्याला गत्यंतर नव्हतं.

शरद् : अरे असल्या गोष्टींनी का कुठे मनोव्यथा उत्पन्न होते ? आता तुझीहि थट्टा करताना खबरदारी घ्यायला हवी. न जाणो नाहीतर त्यामुळे तुलाहि भयंकर मनोव्यथा जडायची! (हसतो)

आनंद : तुला अनिरुद्धाच्या इमारतीचा इतिहास माहित आहे ? अनिरुद्धाने ती इमारत कां सोडली असं वाटतं तुला ? त्या इमारतींत भुताटकी जाणवूं लागली त्याला.

शरद् : (हसतो) भुताटकी जाणवूं लागली म्हणे! सगळ्याच गोष्टी रोमांचकारी बनवायला लागलास तूं.

आनंद : अनिरुद्धाच्या आजोबांचं त्या इमारतीवर किती प्रेम होतं ठाऊक आहे! मरायची वेळ आली तर प्राण जाईना म्हाताऱ्याचा! मरतांना ते म्हणाले की त्याच इमारतीच्या तिसऱ्या मजल्यावर तुळशी वृंदावन बांधा आणि त्यांत माझ्या अस्थि ठेवा. त्याप्रमाणे अनिरुद्धाच्या

वडिलांनी केलं. त्याचा परिणाम असा झाला की अनिरुद्धाच्या आईच्या अंतःकरणांत भीतीनं कायमचं ठाणं मांडलं.

शरद् : ( उपहासाने ) आणि मग अनिरुद्धाला भयंकर मनोव्यथा जडली !

आनंद : ऐकून घे आधी नीट. अनिरुद्धाच्या आईची प्रकृति ढासळली त्या भीतीपायींच. अनिरुद्धाने आपल्या आईची भीति दूर करण्याकरता त्या अस्थि उचलल्या आणि विसर्जन करून आला. त्याचा परिणाम उलट झाला. त्या तिसऱ्या मजल्यावरच्या तुळशी वृंदावनांतून अनिरुद्धाच्या आईला आजोबांचं भूत खवळून बाहेर पडलेलं व अनिरुद्धच्या मानगुटीवर बसलेलं दिसूं लागलं. माझा जीव घ्याहो पण बाळाला सोडा असं किंचाळत अनिरुद्धाच्या आईनं प्राण सोडला. त्याचा अनिरुद्धावर असा परिणाम झाला की त्यालाहि त्या घरांत विचित्र भास होऊं लागले. मन अधिकाधिक खचल्यासारखं होऊं लागलं.

शरद् : अरे हो बाबा, तें सगळं खरं. ते दिवस गेले. आता काय त्याचं ?

आनंद : त्याचं मन असं खचलं असतांना आणखी एक भयंकर आघात झाला त्याच्यावर. तो म्हणजे शरयू प्रकरणाचा शोककारक अंत.

शरद् : ईश्वर मृतात्म्यास शांति देवो असं म्हणायचं आणि दुसरी प्रेयसी शोधायला निघायचं ! अरे ऐन तारुण्यांत अविवाहित राहून का जिवाला समाधान वाटणार आहे ?

आनंद : अनिरुद्धाचं अंतःकरण इतकं उथळ नाही. आठवतं आहे का शरयू प्रकरण तुला ?

शरद् : न आठवायला काय झालं ? त्या शरयूंत ह्याला काय दिसलं न माहित ! तिच्या ठिकाणीं सौंदर्य नव्हतं, की बुद्धिमत्ता नव्हती. फार तर काय दुसऱ्याला मोहून टाकूं शकेल असा एकहि गुण नव्हता. आपण तर बोवा अशा मुलीवर चुकूनसुद्धा प्रेम केलं नसतं. सीतेकडे डोळा वर करून सुद्धा न पाहणाऱ्या लक्ष्मणाप्रमाणे वागलों असतों तिच्याशीं !

आनंद : अनिरुद्धानेहि तिला झिडकारली होती. पण तूं म्हणतोस त्या कारणास्तव नाही. त्याचा अभिमान दुखावला गेला म्हणून. अनिरुद्धाने आपण होऊनच शरयूला मागणी घातली होती. पण शरयूच्या घरच्या मंडळींना अनिरुद्धाचं स्थळ पसंत नव्हतं. म्हणून शरयूच्या तोंडून होकार बाहेर पडला नाही. शरयूच्या घरच्या मंडळींनी अनिरुद्धाला मोठ्या उपेक्षेनं वागवलं. आणि म्हणून वैतागून जाऊन अनिरुद्धाने होकाराची वाट न पाहतां आपण होऊनच शरयूला झिडकारली. त्याचाच तिच्या मनाला मोठा भयंकर धक्का बसला. आधीच आंतल्या गाठीची अन् मनांत कुढत बसणारी होती ती. मी तर तेव्हाच ओळखलं की ही मुलगी झुरून झुरून मरणार. तिच्या वडिलांनी मोठ्या प्रयासानं तिचं दुसरीकडे लग्न जमवलं. आणि मग तिनं जें अंथरूण धरलं तें परलोकाची शिडी म्हणूनच.

शरद् : तात्पर्य काय, की हे तरुण स्त्रियांनो, खंबीर मनाने प्रेमाचे व्यापार करा. नाहीतर तुम्हाला अंथरूण धरावें लागेल तें परलोकाची शिडी म्हणूनच !

आनंद : कथा संपण्यापूर्वीच तात्पर्य काढलंस तूं. आपण झिडकारल्यामुळे शरयूची काय अवस्था झाली हें अनिरुद्धाच्या लक्षांत आलं. त्याचंहि अंतःकरण कळवळून गेलं.

शरद् : साहजिकच आहे. प्रेमिकाचंच अंतःकरण तें !

आनंद : ने सगळं थट्टेवारी ! मला जें सांगायचं आहे तें मी तुला अट्टाहासाने सांगणार. शरयूची शोचनीय अवस्था त्याच्या निदर्शनास येतांच त्याने आपली चूक सुधारण्याचा निश्चय केला. तिच्या भेटीला गेला तो. त्याची चाहूल लागताच शरयूनं हळू हळू पायथ्याचं पांघरूण वर ओढलं व आपल्याला आपादमस्तक झाकून घेतलं. अनिरुद्धाने खूप समजूत घातली तिची. पण तिने तोंडावरचं पांघरूण दूर केलं नाही की तोंडांतून एक शब्द बाहेर काढला नाही. सगळ्यांच्या विचित्र नजरा अनिरुद्धावर खिळल्या होत्या. आणि त्यामुळेच तो झटकन् तेथून निघून गेला. अखेर आणखी दोन महिन्यांनी शरयूचा अंत झाला. अनिरुद्धाला सारखं वाटूं लागलं की आपण दोन मृत्यूंना जबाबदार आहोंत एक आईच्या व दुसऱ्या शरयूच्या. मनाची उद्विग्नता त्याला कांही केल्या सहन करवेना. आपल्याला त्यापायीं वेड लागेल की काय असं वाटूं लागलं त्याला. हळू हळू त्याने कामाचे व्याप वाढवले आणि त्याच्यांत स्वत:चं मन गुंतवलं. एक गोष्ट मला पक्की कळून चुकली आहे की त्याचं मन सारखं कामांत मग्न राहण्यांतच त्याचं हित व सुख आहे. आणि शिवाय त्याच्या जुन्या स्मृति जागृत केल्या म्हणजे एकदमच त्याचं मन भडकतं आणि मन भडकल्यामुळे कामांतून चित्त उठून गेलं की मोठी शोचनीय अवस्था होते त्याची. तुला मोठं गोष्टीवेल्हाळ व्हावसं वाटतं. जुन्या आठवणी उकरून काढण्याची तल्लफ येते. म्हणून हा सगळा इतिहास तुझ्यासमोर पुन्हा उगाळला.

शरद् : वा, केवढी पण कळकळ ! तुला वाटतं की आपणच काय तें अनिरुद्धाची काळजी वाहातों आहों आणि बाकी सर्वजण त्याच्या अंत:करणाला सुरुंग लावतात आहेत. अरे सारखं कामाला जुंपून घेणं हा काय दु:ख विसरण्याचा उपाय आहे ? अनिरुद्धाला म्हणावं, पुरे कर हा श्रमाचा अतिरेक. निदान संध्याकाळीं तरी स्वत:ला असं ह्या खुराडयांत कोंडून घेत जाऊं नकोस. माझ्याबरोबर फिरायला चलत जा म्हणावं.

तीं किलकिल करत जाणारीं पाखरं जरा डोळे भरून पहा म्हणजे आपल्या विशाल अंतःकरणाचं चिमुकलं घरटं बनवून त्यांत एखाद्या पाखराला आश्रय द्यावासा वाटेल. (हसतो)

आनंद : अनिरुद्धाने वाढते व्याप कमी करावे व तुझ्यासारखं रसिक, आनंदप्रिय–हास्यप्रिय, चैनी–तुला वाटेल तो शब्द वापर–पण आपल्यासारखं बनावं असं मुला वाटतंय. तो तुझ्यापासून दुरावतो आहे हें मला मान्य आहे. पण त्याला मागे ओढण्याचा प्रयत्न करूं नकोस. त्याने कामाचे व्याप खूप वाढवले आहेत आणि त्यांत पूर्णपणें गढून गेला आहे. कालांतराने त्याच्या अंतःकरणांतली जखम पूर्णपणें भरून येईल. तोंपर्यंत थांब. तो तुझ्या सहवासांत जर कांही काळ राहिला तर तुझ्यापायीं त्या शरयूबद्दलच्या सगळया दुःखकारक स्मृति जागृत होतील. अन् मग त्याच्या हातून कांहीच कार्य होणार नाही. हें वर्तमानपत्रहि आता चांगलं चालूं लागलं आहे व लवकरच अनिरुद्ध ह्या प्रांतांतला प्रमुख पुढारी होईल अशी मला खात्री वाटूं लागली आहे. श्रम टाळून कां हें सगळं करतां येणार आहे ?

शरद् : अस्सं! म्हणून तूं मला माझ्या जुन्या मित्रापासून तोडायला पाहतो आहेस! आनंद, तूं येण्यापूर्वी मी त्याचा एकमेव जीवश्चकंठश्च मित्र होतों. आता मला त्याला भेटायचीही चोरी झाली. पण हें लक्षांत असूं दे की मीही त्याचा मित्र आहे. तुझ्याहून माझा त्याच्यावर कांही कमी हक्क नाही. काय वाटेल तें होवो, मी त्याला भेटणार. आणि तूं आमच्या मैत्रींत मोडता घालतो आहेस हें सुद्धा अनिरुद्धाला सांगणार.

(खोलीकडे जाऊं लागतो. इतक्यांत कुंदा प्रवेश करते. तिला आलेली पाहून शरद् थांबतो. कुंदा एक अद्ययावत् व सुंदर पोषाख केलेली विदुषी आहे. कुणालाहि चटकन् भारून टाकेल अशी

मोहक व मधुभाषणी वाटल्यावाचून राहणार नाही. तिच्यांतली विशेष उल्लेखनीय अशी छटा म्हणजे बालिश प्रौढीची. स्वतः-बद्दल तिला अतिशय अभिमान असून ती स्तुतिप्रिय आहे. आणि हा तिचा स्वभाव सगळ्यांना माहीत आहे.)

शरद् : हें पहा कुंदाताई, मीही तुमच्याप्रमाणे अनिरुद्धाच्या भेटीला आलों होतों. पण हा घटिंगण आडमुठ्या पुरभय्याप्रमाणे मला रोखून राहिला आहे. (हसतो) पण कुंदाताई, तुमचं सामर्थ्य कांही विशेष आहे. तुमच्यापुढे ह्या घटिंगणाची कांही मात्रा चालायची नाही. तुम्ही काढा अनिरुद्धाला बाहेर म्हणजे माझ्या येण्याचं तरी सार्थक होईल.

कुंदा : म्हणजे माझ्या मदतीशिवाय तुम्हाला अनिरुद्धाची भेट घेतां आली नाही?

शरद् : खरं म्हटल्यास अनिरुद्धाची कोणाला भेट घेऊं देणं अन् न घेऊं देणं ही तुमच्याच अधिकाराची बाब आहे. (हसतो.)

कुंदा : माझी थट्टा करतां अं! बरं कांही हरकत नाही.

शरद् : छे छे, इतकं गंभीर सत्य मी आजपर्यंत कधीच बोललों नव्हतों. (हसतो.)

आनंद : बसा न कुंदाताई. (तिला बसायला खुर्ची सरकवतो.)

कुंदा : माफ करा. मी बसायला आलें नाही. काकांनी अनिरुद्धांना बोलावलं आहे आणि मी त्यांना आपल्या बरोबर घेऊन जाणार आहे.

आनंद : पण कुंदाताई, आज अनिरुद्धाला मुळीच फुरसत नाही.

कुंदा : पण काय सांगायचं तें त्यांनाच सांगू दे. ते जर म्हणाले की मला फुरसत नाही तर काय करायचं तें माझं मी पाहून घेईन. तुम्हांला काय वाटतं की मी आमंत्रण दिल्यावर ते फुरसत नाही म्हणून सबब सांगतील?

शरद् : ( खूष होऊन ) लाखांत एक गोष्ट बोललांत तुम्ही. ( आनंदाला ) हजार कामं बाजूला सारून तो यांच्या आमंत्रणाचा स्वीकार करील. ( हसतो. )

आनंद : कदाचित् येईलहि, कांही नेम नाही. पण मला मात्र त्यानं अगदी बजावून सांगितलं आहे की कुणाला भेटीला आंत सोडायचं नाही म्हणून. सगळ्यांनाच मज्जाव केला आहे त्यानं.

कुंदा : पुरुषांना मज्जाव असेल. मला नाही. आनंदराव, तुम्ही अनिरुद्धांची किती काळजी वहातां ! तुमचं त्यांच्यावरचं अकृत्रिम प्रेम पाहिलं की मला तुमचं अतिशय कौतुक वाटतं. अनिरुद्धांचं सद्भाग्यच म्हटलं पाहिजे की त्यांना तुमच्यासारखा जीवाला जीव देणारा दोस्त मिळाला.

आनंद : त्याची कीर्ति दिगंत पसरली म्हणजे मला सर्व कांही भरून पावलं.

कुंदा : तुमचा मग जाहीर सन्मानच करूं आम्ही. तुम्हाला त्यांना प्रति हिटलर बनवायचं आहे. त्यांना तुम्ही वाटेल त्या महत्पदाला न्या. पण आम्हाला काय त्यांच्या मोठेपणाचं ! काय चाललंय आंत स्वारीचं ?

आनंद : अजरामर कीर्ति मिळेल असा अद्वितीय तत्त्वज्ञानावरचा ग्रंथ तयार करण्याच्या तो उद्योगाला लागला आहे. फारच प्रचंड काम आहे तें. दिवसभर तो वर्तमानपत्राच्या कामांत असतो. ह्याच वेळ काय तो त्याला आपल्या ग्रंथाचीं टिपणं तयार करायला मिळतो. राजकारणी मनुष्याची कीर्ति शाश्वत नसते. म्हणून शाश्वत कीर्ति मिळवून देणारा ग्रंथ त्याला तयार करायचा आहे.

कुंदा : मग या अशा थोर मनुष्याचं दर्शन घेतलंच पाहिजे ! ( जाऊन दारावर बोटांनी टिकटिक करते ).

आनंद : थोडा वेळ थांबा नं. तो येईलच आता बाहेर. नगर-भवनांत त्याचं भाषण आहे. जेवणखाण करून त्याला तयार व्हायचं आहे.

कुंदा : हो का ? मग तर आणखीच घाई करायला हवी. नाही तर ते ऐनवेळीं खोलींतून बाहेर पडायचे अन् त्यांना जेवायला सुद्धा पुरेसा वेळ मिळणार नाही. आणि जेवण्यापुरता वेळ मिळाला नाही तरी बोलायला फुरसत मिळणार नाही. (पुन्हा दारावर टिचक्या मारते. शरद् तिच्या मदतीला येतो आणि जोराने दार धडधडावतो. आंतून 'कोण आहे?' असा अनिरुद्धाचा आवाज येतो.) म्हटलं दार उघडा अन् प्रत्यक्ष पहा.

अनिरुद्ध : (आंतूनच) आणखी थोडा वेळ थांब, कुंदा. येवढं आटोपतों अन् येतोंच.

कुंदा : आता आणखी क्षणभर सुद्धा मला थांबायला फुरसत नाही. आणि मी असं घटकान् घटका तिष्ठत उभं रहाण्यांत वेळ खर्चू लागलें तर माझं आयुष्य फुकट जाईल. (हसते व शरद् तिला हसण्यांत साथ करतो.) आनंदराव, वेळेचं फार महत्त्व असतं! पण अनिरुद्धांना तें अद्याप पटलेलंच नाही.

(अनिरुद्ध बाहेर येतो. आता तो अधिक थकलेला दिसतो.)

अनिरुद्ध : तूं फार व्यत्यय आणतेस कुंदा माझ्यां कामांत.

कुंदा : तुमच्या कामांत मुळीच हरकत येऊं नये अशी माझी इच्छा असते. पण मी काय करूं ? शरद् म्हणाले की दार ठोठवाच. आणि आनंदरावांनी तर तुम्हाला खोलींतून बाहेर काढण्यासाठी अगदी गळ घातली. म्हणून मी वाईटपणा पत्करला, तुमच्या कामांत व्यत्यय आणला अन् तुम्हाला बाहेर काढलं.

अनिरुद्ध : असं, आनंदहि तुम्हाला फितूर झाला तर ?

आनंद : नाही रे, मी तर म्हणत होतों--

कुंदा : की आपण सगळेजण मिळून एकदम अनिरुद्धांच्या खोलीवर हल्ला चढवूं. पण मी म्हणालें, कांही नको, मी एकटी पुरे आहें. तरी शरद्‌ना राहवलं नाहीच. माझ्याबरोबर त्यांनीहि दार ठोठावलंच.

अनिरुद्ध : (शरद्‌ला पाहून) अरे वा, बऱ्याच दिवसांत भेटलास.

शरद् : छान, चोराच्या उलटया बोंबा ! इकडे भेटूं नये म्हणून व्यवस्था करून ठेवायची आणि वरून म्हणायचं अरे वा, बऱ्याच दिवसांत भेटलास ! (अनिरुद्ध एकदम घट्ट डोळे मिटतो व कपाळ दाबतो.) अनिरुद्ध, प्रकृति ठीक नाही तुझी? किती खालावलेली दिसते तुझी प्रकृति. काय होतंय तुला ?

अनिरुद्ध : कांही नाही, जरा दमून गेलों होतों. आनंद, प्रथम चांगला स्ट्रॉंग चहा बनव. कुंदा, तुझी हरकत नसेल तर सिगारेट ओढतों. सिगारेट ओढली म्हणजे शीण जातो. (चंदूला चहा आणायला सांगतो व सिगारेट काढतो.)

कुंदा : चहा अन् सिगारेट ओढून श्रमपरिहार करण्यापेक्षा श्रमच जरा कमी केले तर नाही का चालणार?

अनिरुद्ध : अजून इतके श्रम करण्याची सवय झाली नाही म्हणून जरा जास्त थकून गेल्यासारखं वाटतं. सवयीनं एकदा इतकं काम करणं अंगवळणीं पडलं म्हणजे मग नाही कांही वाटायचं. नेपोलियन नाही का, दिवसाकाठीं बावीस तास श्रम करीत होता. दोन तास काय ती झोप घेई. अन् रणमैदानावर असतांना तर चोवीस तासांत दहा मिनिटं. कार्ल मार्क्सने अन् लेनिनने किती श्रम केले हें विसरूं नकोस. श्रमाशिवाय कां हातून थोर कामगिरी होते ?

शरद् : अरे बाबा, मिळाला आहे येवढा मोठेपणा काय कमी झाला ?

अनिरुद्ध : आपण मोठे झालों असं वाटलं की आटोपलंच सगळं कर्तृत्व. एक नवीन सिद्धान्त सांगतों तुला, ऐक. न्यूनगंड आणि अहंकार यांच्या संघर्षातून प्रभावी व्यक्तिमत्त्व उत्पन्न होत असतं. कुंदा, ही वस्तुस्थिति आली होती कधी तुझ्या लक्षांत ?

कुंदा : मी कधी त्यावर विचारच केला नाही.

अनिरुद्ध : कुंदा तूं अत्यंत बुद्धिमान् आहेस. एम्.ए. ला तूं तत्त्वज्ञान घेतलं आहेस. माझे एकेक सिद्धान्त समजावून सांगायला जगांत तुझ्याइतकी योग्य व्यक्ति दुसरी कोणी नाही. तुला मी माझा एकेक सिद्धान्त समजावून सांगूं लागलों म्हणजे मला कार्ल मार्क्स अन् फ्रेडरीक एंजल यांची आठवण होते. मार्क्स आपला कोणताही सिद्धान्त प्रथम एंजलला समजावून सांगे. एंजलला तो सिद्धान्त पटवून देण्याकरता आठ आठ दिवस खर्ची पडले तरी त्याला त्याचं कांही वाटत नसे. पण एंजलला तो सिद्धान्त पटला की मार्क्सला कृतार्थ झाल्यासारखं वाटे. एंजलला पटलेला सिद्धान्त मुळी चूक असूंच शकत नाही असा मार्क्सचा विश्वास असे. तसंच मला वाटतं की कुंदाला पटलेला सिद्धान्त मुळी चूक असूंच शकत नाही.

शरद् : तूं नि कुंदा आणि मार्क्स–एंजल ह्या दुक्कली सारख्याच कां ? (हसतो.) मार्क्स अन् एंजल यांचं बरं होतं रे. आठ आठ दिवसच काय पण सबंध आयुष्यभर तेंच तें रूक्ष चऱ्हाट वळत राहिले असते तरी त्यांत कांही विशेष नव्हतं. पण तूं आणि कुंदा काय असंच जन्मभर तत्त्वज्ञानाचं रूक्ष चऱ्हाट वळत राहणार आहांत ? कुंदाताई, दुर्दैव आहे तुमचं (हसतो).

कुंदा : अनिरुद्ध, तुमचे एकेक सिद्धान्त ऐकणं, समजावून घेणं आणि त्यावर वादविवाद करणं मला आवडतं. पण शरद्‌च्याच सारखं मला वाटतं, की तेंच तें नेहमी नको.

अनिरुद्ध : मग मी काय बोलावं असं वाटतं तुला ? तुला काय कोर्टांतले बखेडे सांगूं, की वर्तमानपत्रांतल्या खून, मारामाऱ्या, जाळपोळ, आत्महत्या यांच्या हकीगती वर्णूं ? नाही तर मग शेले अन् कीट्स ह्या स्वप्नाळू कवींच्या कविता आहेतच. त्या चर्चेला घ्यायच्या, चर्चा करतां करतां गहिवरायचं अन् रडायचं. काय अर्थ आहे कुंदा त्यांत ? त्यापायीं आपलीं अंतःकरणं आणखी नाजूक, हळवीं अन् दुबळीं बनतात. आयुष्यांत कांही करायचं असेल तर प्रथम म्हणजे खंबीर अंतःकरण हवं.

कुंदा : तुम्ही जन्मांत कधीच कविता केली नाही ?

अनिरुद्ध : कॉलेजांत असतांना काय कविता केल्यावाचून राहवतं ? त्या स्वप्नाळू दिवसांत मीहि पुष्कळ कविता केल्या. आता त्या सगळया कविता हवेवर उडून गेल्या आहेत. त्यांतली एकसुद्धा मला आता आठवायची नाही. ( चंदू चहा घेऊन येतो. )

कुंदा : एकहि कविता आठवायची नाही ! मला नाही शक्य वाटत. कांही कांही कविता आपण अविस्मरणीय प्रसंगीं लिहिलेल्या असतात. त्या प्रसंगाच्या आठवणीबरोबर ती कविताहि आठवलीच पाहिजे.

अनिरुद्ध : ( अतिशय गंभीर होऊन ) विस्मरणाची आपल्याला अधिक जरूर असते. कवितांच्याच काय पुष्कळशा जुन्या प्रसंगांच्यासुद्धा.

कुंदा : तुम्ही लिहिलेल्या सगळ्याच कविता कांही दुःखस्मृति जागृत करणाऱ्या नसतील. मलाच एक कविता आठवते आहे. तुम्ही आपल्या वाचनसमाधींत असतांना मी तुमचीं कपाटं तपासून पाहिलीं आहेत. एकदा माझ्या हातीं एक कागदाचं चिटोरं सापडलं त्यावर होती ती. ती वाचून मला तर फार आनंद झाला.

अनिरुद्ध : ती कविता वाचायला आता मला आनंद वाटेल की नाही शंकाच आहे.

कुंदा : फार हृदयंगम होती ती. चंद्राला उद्देशून लिहिली होती तुम्ही.

अनिरुद्ध : चंद्राला उद्देशून ?

कुंदा : यक्षानं मेघदूताला आपली भावकथा सांगितली अन् त्याच्यावर आपला संदेश आपल्या प्रियेला कळवण्याची कामगिरी सोपवली—अगदी तसंच तुम्ही केलं होतं.

अनिरुद्ध : (हसतो) कालिदास मेल्यापासून आजपर्यंत जग सुधारलं नाही हेंच खरं! मेघाशीं बडबड करणारा यक्ष आणि चंद्राशीं बोलणारा विसाव्या शतकांतला मी—छे, जग सुधारत नाही हेंच खरं.

शरद् : एक गोष्ट विसरतोस तूं अनिरुद्ध. आयुष्यांत मूर्ख-पणालाहि फार महत्त्व आहे. प्रत्येक ठिकाणीं अगदी शहाणपणानं वागायचं ठरवलं तर फारच अवघडल्यासारखं होऊन जाईल.

आनंद : पण तें कुणाला? तुझ्यासारख्याला.

(सर्वजण हसतात)

शरद् : (अट्टाहासाने) जगांत मूर्खपणा नसता तर आपल्याला हसायला विषयच मिळाला नसता आणि हसण्याशिवाय जीवित नको नकोसं झालं असतं.

आनंद : मूर्तिमंत तूं असल्यावर हसायला दुसरा विषय कशाला हवा!

अनिरुद्ध : बरोबर आहेरे शरद् तुझं म्हणणं. माझी कविता हसायला चांगली आहे हें मला अगदी तंतोतंत पटलं.

कुंदा : पण कविता आठवते का? की उगाच टीका करीत सुटलांत ?

अनिरुद्ध : आठवत तर नाही बोवा.

कुंदा : मला ती पाठ नाही. सारांश सांगतें.

आनंद : अनिरुद्ध, व्याख्यानाला जाण्याची वेळ होत आली. अजून आपल्याला खानावळींत जायचं आहे.

अनिरुद्ध : अरे हो. कुंदा, मला भाषण करायला जायचं आहे. नगरभवनांत सभा आहे.

कुंदा : जाल हो. येवढी काय घाई आहे ? अगदी वेळेवर सभा भरण्याचं युग अजून यायचं आहे. आणि न गेलांत तर काय मोठंसं बिघडणार आहे ?

अनिरुद्ध : वा, वा, असं कसं होऊं शकेल. आनंदानं कळवून दिलं असेल की मी भाषण करायला येणार आहे म्हणून. कळवलंस का आनंद ?

आनंद : अरे, विसरूनच गेलों. पण तूं येणार असंच ते धरून चालतील.

शरद् : बरंच आशावादी म्हटलं पाहिजे त्यांना (हसतो).

अनिरुद्ध : बरं आनंद, तूं जाऊन जेऊन ये. मला भूक नाही. पोटांत स्वस्थ नाही माझ्या.

कुंदा : काय होतंय ?

शरद : दर तास दोन तासांनी चहा लागतो याला. दिवसाकाठी दहा-बारा कप चहा ढोसतो. भूक लागेल कुठून ? आणि काम चाललंय तोंपर्यंत सारखी सिगरेट ओठाला लागलेली. कुंदाताई तुम्ही आता याच्या या सवयीवर नियंत्रण घातलं पाहिजे. दुसऱ्या कोणाचं हा ऐकणार नाही.

कुंदा : अनिरुद्ध, किती खालावली आहे तुमची प्रकृति ! तुम्ही पुरेशी विश्रांति नाही घेत. मला वाटतं की रात्रीं तुम्ही पुरेशी झोप सुद्धा घेत नाही.

अनिरुद्ध : तसं नाही ग. पुरेशी विश्रांति घ्यायला पाहिजे हें मला समजतं. रात्रीं बाराला मी काम आटोपतोंच.

कुंदा : किती तास झोपतां तुम्ही ?

अनिरुद्ध : झोप नाही येत नीट. आंग मोडून आल्यासारखं होतं. कपाळ, डोळे हातापायाचे तळवे तापल्यासारखे वाटतात. सारखी तगमग वाढूं लागते. त्या तशा अवस्थेंत पडलं रहायचं–असह्य होते ती स्थिति. आणि म्हणतात नं की रिकाम्या मनांत सैतानाचा कारखाना सुरू होतो–मग नाही नाही ते विचार येतात.

कुंदा : अनिरुद्ध, स्वतःला जपलं पाहिजे तुम्ही.

अनिरुद्ध : हो कुंदा, झोप घ्यावीशी वाटते. खूप आराधना करतों तिची आणि मग वैतागाने उठतों.

शरद् : आणि मग पुनः चहा सिगरेट !

अनिरुद्ध : हो त्यानं जरा बरं वाटतं. रात्रीं पुन्हा मग कामाला लागतों. एकदा मन कामांत एकाग्र केलं की मग मात्र शुद्ध हरपते. थकल्यासारखं वाटल्यावर पुन्हा अंथरुणावर जाऊन पडतों. झोप आली तर ठीक; नाही तर पुनः काम.

आनंद : मीहि जात नाही आता जेवायला. वेळ होऊन गेली. आपण जर वेळेवर न गेलों तर कुणाला तरी येथे बोलवायला येण्याचा त्रास पडेल.

शरद् : अनिरुद्धाची प्रकृति ठीक नाही आणि म्हणून आज तो येणार नाही असं कळवून दे. आणि अनिरुद्धाला भाषण करायची तल्लफच आली असेल तर कुंदाताई आणि मी आहोंतच इथे. ( हसतो. )

आनंद : मग अनिरुद्ध काय विचार ठरला तुझा ?

कुंदा : आनंदराव, आता मी अनिरुद्धांना पूर्णपणें विश्रांति घ्यायला लावणार आहे. आज ते व्याख्यानाला जाणार नाहीत. उद्या-

पासून कचेरीचं सगळं काम तुमच्याकडे. अनिरुद्ध आमच्या इथे चलणार आहेत. काकांच्या ट्रीटमेंटखाली आठ दिवस रहातील. प्रकृति पूर्ववत् झाल्यावर मग आहेच काम.

अनिरुद्ध : किती हुकमत गाजवतेस कुंदा ! आणि स्वतःवर तरी किती दगदग ओढवून घेतेस.

कुंदा : काका नेहमी काय म्हणतात ठाऊक आहे नं तुम्हाला ? काका म्हणतात की पुरुष वयानं वाढतात, एका विशिष्ट दिशेनं त्यांची खूप वाढ होते, पण इतर बाबतींत त्यांची स्थिति अगदी अजाण बालकासारखी असते.

शरद् : आणि स्त्रियांच्या ठिकाणीं स्वभावतःच मातृत्व असतं. दुसऱ्यांना अगदी कुकुलं बाळ समजून वागवतात त्या. (हसतो.) हौसच असते नं वात्सल्याची ! (पुनः हसतो.)

कुंदा : (रोषाने) शरद्, फार थट्टा करतां तुम्ही माझी !

आनंद : अनिरुद्ध, तूं भाषण करायला येऊं शकत नाहीस असं आता पंधरा मिनिटांत कळवून येतों. थांब तोंपर्यंत. मग जाऊं जेवायला.

कुंदा : अनिरुद्ध आता आमच्या घरीं येतील जेवायला.

अनिरुद्ध : माफ कर कुंदा. विनाकारण त्रास नको करून घेऊस. (आनंद निघून जातो.)

कुंदा : आनंदरावांच्याबरोबर खानावळींतलं अन्न अधिक गोड लागतं ना ?

अनिरुद्ध : तें कांही खोटं नाहीं कुंदा. आनंदासारखा मित्र मिळणं मोठी सुदैवाची गोष्ट आहे. चोवीस तास माझ्या सुखाकरता अन् उत्कर्षाकरतां झटत असतो.

शरद् : जन्मभरच तर साथ करणार आहे तो ! जन्माची साथ करणारीं माणसं वेगळींच असतात. केव्हा रे समजणार तुला हें ?

कुंदा : माझ्या निरोपानें तुम्ही विश्रांतीकरतां आमच्या घरीं (हसतो) येणार नसाल तर तसं सांगा म्हणजे काकांना पाठवतें. त्यांच्या जवळ नाही चालायच्या ह्या गमजा.

अनिरुद्ध : पण कशाला घेतां हा त्रास तुम्ही? इथे काय वाईट आहे?

कुंदा : (अनिरुद्धाच्या खोलीकडे बोट दाखवून) या खुराडयांत राहतां तुम्ही. माझ्याच्यानें एक क्षण बसवत नाही तेथे. आणि हा दिवाणखाना म्हणजे तुमच्या वर्तमानपत्राची कचेरी, सगळयांचीं कामं करण्याची जागा आणि हीच तुमची कुणी आलं तर गोष्टी करत बसण्याची बैठक. सार्वजनिक स्थळ आहे हें. काय विश्रांति मिळणार आहे तुम्हाला इथे?

अनिरुद्ध : आणखी चार आठ दिवसांची गोष्ट. तात्या प्रवास आटोपून लवकरच परतणार आहेत. आजच आलं त्यांचं पत्र. त्यांची प्रकृति खालावली आहे म्हणून त्यांनी पुढचा प्रवास रद्द केला आहे. ते आले म्हणजे मग स्वतंत्र बिऱ्हाडच थाटूं.

कुंदा : तात्या कांही तुमच्याजवळ रहायचे नाहीत. दोन कुटुंब-वत्सल भाऊ आहेत तुम्हाला. रामच्या घरीं रहातील नाही तर विजूच्या.

अनिरुद्ध : त्या दोघांवर तात्यांचा किती राग आहे हें ठाऊक नाही का तुला कुंदा?

कुंदा : तो राग केव्हाच विसरूनहि गेले असतील.

अनिरुद्ध : तात्यांना मी जास्त ओळखतों. ते माझ्याजवळच रहातील.

कुंदा : तुमच्यावर त्यांचं सगळयांत जास्त प्रेम आहे. होय नं?

अनिरुद्ध : हो. पण तें प्रेम जीव अधिकच व्याकुळ करतं. आईनंहि माझ्यावर अतोनात प्रेम केलं—आणि--(वाक्य अर्धवट

सोडून क्षणभर शून्य दृष्टीने पहात रहातो. व मग सुस्कारा सोडतो.) सगळं दुःखाकरतांच !

कुंदा : मग चलतानं जेवायला? तें कांही नाही, तुम्ही आलंच पाहिजे. चला.

अनिरुद्ध : आनंद येईपर्यंत थांबलंच पाहिजे.

कुंदा : ठीक आहे. थांबतें तोंपर्यंत मी. शरद् तुम्हीहि चला.

शरद् : अनिरुद्धाबरोबर मला कशाला विनाकारण बोलावतां. माझं लग्न झालंय ! ( हसतो.)

कुंदा : (रोषाने) म्हणजे, तुमच्या म्हणण्याचा अर्थ काय ?

शरद् : असं काय करतां ? माझी बायको नसेल कां स्वयंपाक करून वाट पहात बसलेली ? ( हसतो. अनिरुद्धहि हसतो. )

कुंदा : अस्सं. आता समजलं.

अनिरुद्ध : मग तुला काय वाटलं होतं ?

कुंदा : मला नाही माहीत जा !

शरद् : अरे अजून नाही आला हा आनंद ? की झाला कुठे बेपत्ता ?

( चंदू चहा आणून देतो. जरा वेळ कोणीच बोलत नाही. )

कुंदा : मग आठवली मघाची कविता ?

अनिरुद्ध : आता कुठून आठवणार ?

कुंदा : मी सांगतें त्या कवितेचा अनुवाद. तुम्ही चंद्राला उद्देशून लिहिलं होतं.

'हे चंद्रा, तुझा चेहरा प्रेमानं अन् सहानुभूतीनं पहाणाऱ्या स्त्रीसारखा आहे ! तूं माझ्याकडे पहातो आहेस. माझ्या डोळ्यांतले भाव तुला दिसत आहेत. समजतो नं तुला त्यांचा अर्थ ?'

शरद् : ( रसिकता दाखवत ) आहाहाहा ! ( हसतो. कुंदाऱ्याहि चेहऱ्यावर स्मित झळकतें. )

कुंदा : ऐका, पुढे काय लिहिलं होतं तें सांगतें.

'हे चंद्रा, ह्या भावपूर्ण नयनांची प्रतिमा तिच्याकडे परावर्तित कर. दाखव तिला हे भावपूर्ण नयन. सांग तिला त्यांचा अर्थ.'

(हसत) काय, लिहिलं होतंत की नाही असं ? बोला. (अनिरुद्ध अगदी गंभीर असतो. शरद् मात्र एकदम जोराने हसतो.)

शरद् : कुंदाताई, तुम्ही चोर तर अगदी मुद्देमालासहित पकडलात. (पुनः हसतो.)

कुंदा : ही 'ती' कोण होती? (अनिरुद्ध गंभीरच असतो.)

शरद् : तें तुम्हाला माहित असूं नये म्हणजे आश्चर्यच म्हटलं पाहिजे. (हसतो.)

कुंदा : बरं पुढे तर ऐका,

'पण हे चंद्रा, तूं लबाड आहेस. यावेळेला तीहि अशाच भावपूर्ण नयनांनी तुझ्याकडे पहात असेल. तिच्या अंतकरणांतले सगळे सुकोमल, मुग्धमधुर भाव तिच्या डोळयांतून ओसंडत असतील. तिची जिव्हा तिच्या अंतःकरणाशीं सहकार्य करीत नाही. डोळे करतात. अंत:करण व्याकुळ झालं अन् डोळयांत पाणी आलं तर तें ती तुझ्याशिवाय कुणाला दिसूं देणार नाही. पण लबाडा, तूं एकदा तरी त्या भावपूर्ण नयनांची प्रतिमा इकडे परावर्तित केलीस कां? तूं माझ्या नयनांतले भाव पहातोस आणि तिच्याहि पण. कांही कामाचा नाहीस तूं.'

शरद् : खरंच चंद्रहि कांही कामाचा नाही अन् त्याला केलेली आर्जवंहि कामाचीं नाहीत. (हसतो).

कुंदा : छे, छे, शेवटीं चंद्राला हे कविराज म्हणाले,

'चुकलोंच मी, तिचं प्रतिबिंब तुझ्या चेहऱ्यावर विलसतं आहे म्हणून तर तूं प्रेमानं अन् सहानुभूतीनं पाहणाऱ्या स्त्री-सारखा दिसतोस.'

भले कविराज ! (कुंदा अन् शरद् दोघंहि हसतात. अनिरुद्ध गंभीरच असतो.)

अनिरुद्ध : कुंदा, कां काढलीस त्या कवितेची आठवण ? मला ती कविता सांगण्यांत काय हेतु होता तुझा ?

कुंदा : सारखं रुक्ष वातावरणांत वावरत असतं तुमचं मन. त्यापायीं सगळी कोमलता नष्ट होते आहे. म्हटलं, तुमच्या गुदमरलेल्या अंत:करणाला त्या तुम्हींच लिहिलेल्या सुंदर काव्याची झुळूक कांही तजेला आणील. (आनंद परत येतो.)

अनिरुद्ध : (चिडून) तजेला ? मला नको आहेत त्या जुन्या स्मृति. त्यांची आठवण करायची, गहिवरायचं अन् रडायचं ! मन हळवं अन् दुबळं बनवून अखेर झुरून झुरून मरायचं ! हें जग नाजुक अन् कोमल अंत:करणाच्या लोकांकरितां नाही. सगळे वार अन् आघात सोसायचं सामर्थ्य असलेल्या लोकांची हें जग कर्मभूमि आहे. मला आनंदासारख्या कणखर मनुष्याचा सहवास मानवतो. त्या नाजूक अन् कोमल संवेदना जागृत करण्याची अन् नंतर रडगाणं गायची मला हौस नाही. तुम्हां लोकांशीं गोष्टी करत बसलं की केव्हाना केव्हा गाडी येते त्याच वळणावर. कुंदा, मला विश्रांति नको. मी रिकाम-टेकड्यासारखा बसलों राहिलों तर स्मृतींचीं जुनीं भुतं थैमान घालायला सरसावतील. माफ कर कुंदा. मला विश्रांति घ्यायला आपल्या घरीं बोलावूं नकोस. मी इथेच आनंदाच्या सहवासांत बरा आहे. मला

सारखा कामांतच गढलेला असूं दे. मी जोंपर्यंत कामांत गढलेलों आहें तोंपर्यंतच सुखी आहें.

कुंदा : (गंभीर होऊन) माफ करा. मी तुम्हांला दुःख दिलं.

अनिरुद्ध : तूं आपण होऊन नाही दिलंस कुंदा. पण आनंद बरोबर जाणतो. म्हणून त्याला माझं शरद्शीं अन् तुझ्याशीं बोलत बसणं रुचत नाही.

( अनिरुद्ध टेबलाजवळ जातो व कपाळ दाबून बसतो. )

कुंदा : काय झालं अनिरुद्ध ?

अनिरुद्ध : कांही नाही कुंदा, फार थकून गेलों होतों. आणि मन असं उद्विग्न झालं म्हणजे जाणवतं तें.

आनंद : (शरद्ला) फालतू गोष्टी विनाकारण उकरून काढत जाऊं नकोस म्हणून हजारदा बजावलं असेल तुला. पण जन्मांत कधी शहाणपण आलं नाही तुला.

कुंदा : (रागावून) शिव्याशाप द्यायचे झाले तर मला द्या नं. अपराध माझ्या हातून घडला आहे.

आनंद : ( शरद्ला ) आता तरी पटलं कां तुला माझं म्हणणं !

शरद् : तुझ्या तावडींतून अनिरुद्धाला सोडवायला हवं हें पटलं मला.

आनंद : घटकाभर बाहेर गेलों तर असा मनस्ताप उत्पन्न केलास आणि—

कुंदा : ( चिडून ) काय समजतां हो तुम्ही स्वतःला ! तुम्हाला काय वाटलं की बाकीचे सर्वजण अनिरुद्धांचा जीव घ्यायला उठले आहेत ! जरासं विपरीत घडलं तर असं अद्वातद्वा बोलूं लागलांत !

अपमान करतां आहांत तुम्ही माझा. तुमच्यासारख्या वाटेल त्या माणसाकडून अपमान करून घ्यायला नव्हतें आलें मी. (आनंदाकडे क्रोधाचा कटाक्ष टाकीत निघून जाऊं लागते.)

अनिरुद्ध : कांही झालं नाही मला. कुंदा—(कुंदा जाते) शरद्, जा जा, सांग तिला, मला कांही झालं नाही. तिच्यापासून कांही त्रास झाला नाही. (शरद् जातो. अनिरुद्ध पुनः कपाळ दाबून बसतो.)

# २

[ कुंदाच्या राहत्या बंगल्याचा अद्ययावत् पद्धतीने सजवलेला प्रशस्त दिवाणखाना. पाठीमागच्या बाजूला वर जाण्याचा जिना असून माडीवरच कुंदाची खोली आहे. जिन्याच्या खालच्या बाजूला बाहेर जाण्याचें दार असून दाराच्या पलीकडे पडवी व त्यापलीकडे बाग आहे. दिवाणखान्याच्या उजव्या बाजूला दोन दारं असून त्या बाजूला माजघर, स्वयंपाकघर वगैरे भाग आहेत. डाव्या बाजूला दोन दारं असून तीं काकासाहेबांच्या खाजगी खोल्यांचीं आहेत.

दिवाणखान्यांत तीन चार सुंदर देखाव्यांच्या मोठ्या तसबिरी आहेत. इतर लहान लहान तसबिरी लटकविल्या असून त्यांत लुई पाश्चूर, जेनर इत्यादि वैद्यक विद्येतील संशोधक, कबीर, ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम व टागोर हे कवि, ॲरिस्टॉट्ल, प्लेटो, कान्ट, हेगेल, मार्क्स व स्पेन्सर हे तत्त्वज्ञ व जगांतील स्वातंत्र्य-विमोचनाकरता लढणाऱ्या थोर विभूति यांचीं छायाचित्रें आहेत.

लहान लहान तसबिरी लावण्याचा कुंदाचा छंद आहे. तो घरां तल्या मंडळींचा थट्टेचा विषय झालेला आहे.

सर्व सजावटींत कलादृष्टि प्रकट झालेली दिसून येईल. दारांना सुंदर पडदे असून रंगसंगतीकडे विशेष लक्ष पुरविलेलें आहे. कोन साधून दोन तीन पुतळ्यांची मांडणी केलेली आहे.

मध्यभागीं टेबलावर डॉ. साठे ऊर्फ काकासाहेब आणि कुंदाची आई बुद्धिबळ खेळत आहेत.

काकासाहेबांचें वय सुमारें सत्तावन वर्षांचें आहे. काकासाहेबांची प्रवृत्ति खेळकर असून प्रत्येकाशीं ते बरोबरीच्या नात्याने वागतात. स्वभाव संतोषी व आनंदी. पण चटकन् कुणाशींहि समरस होतात. डॉक्टरी रोमारोमांत भरलेली आहे. प्रत्येकाच्या प्रकृतिकडे अतिशय लक्ष पुरवतील. बेबी व कुंदा त्यांच्याशीं जास्त मोकळेपणानं वागतात व बोलतात.

कुंदाची आई दिसायला अतिशय शांत व गंभीर. सगळी जबाबदारी आपल्यावर आहे असं त्यांचं वागणं असतं. काकासाहेबांना सुद्धा त्यांच्याविषयीं अतिशय आदर आहे. कुंदाच्या आईचा स्वभाव शांत अन् गंभीर असून तितकाच प्रेमळ आहे.

पलीकडे कोचावर बेबी पाय पसरून बसली असून फिड्लशीं चाळवाचाळव करीत आहे.]

काका : ए बेबी, नीट वाजव नं फिडल. अन् गाणं म्हण एखादं.

[बेबी फिड्लची चाळवाचाळव बंद करते व गंभीर चेहरा करून बसते.]

काका : अहो सुषमाताई!

बेबी : काय काका?

काका : आता आमचा राजा फिरतीवर निघतोय्. म्हणून म्हटलं की फिड्ल वाजवा, गाणं म्हणा म्हणजे तो ताला ठेक्यावर चालूं लागेल. तसं चालणं त्याच्या मोठं जिवावर येतं आहे.

बेबी : पण चुकलं तर नांवं नाही ठेवायचीं, तुम्ही मग थट्टा करतां माझी.

काका : बरं आता नाही करणार थट्टा.

[बेबी फिड्ल वाजवूं लागते. पण तें नीटसें जमत नाही. थोडयाच वेळांत कुंदा जिन्यावरून खाली येते. सर्व लहान तसबिरींवरून एकदा नजर फिरवते व एक तसबीर वाकडी असते ती सरळ करते. बेबी फिड्ल बाजूला ठेवून कुंदाला चिडवण्याकरता गाऊं लागते.]

बेबी : कुणि असेल ग, कुणि असेल ग,
असेल चिमणारावा
कुठं तरी कुठिल तरी गावा

काका : (कुंदाला) कां, आणखी एखादा थोर पुरुष तुझ्या तावडींत सापडला की काय? या दिवाणखान्यांत तर हिनं सगळया थोर व्यक्तींचं संमेलनच भरवलं आहे.

बेबी : काका, आणखी एक थोर पुरुष ताईला सापडला आहे. पण त्याची तसबीर इथे नाही लागणार.

कुंदा : (रागावून) बेबी, फाजीलपणा पुरे कर.

बेबी : (कुंदाला चिडवण्याकरिता गाऊं लागते.)

कुणि असेल ग, असेल लाडिक माझा
स्वप्नांतिल तुझिया राजा
कुणि येइल ग, येइल ग न्यायाला
या नाजुकशा कमळाला

[कमरेवर हात ठेऊन विजयोन्मादाने हसते व नाचते. कुंदा तिकडे दुर्लक्ष करून तसबिरीशीं कांहीतरी चाळा करते.]

बेबी : (काकांच्या अगदी जवळ येऊन) काका, ताईला किनई थोर माणसं खूप खूप आवडतात.

आई : कुंदा, बाहेर नाही जायचं तुला ?

कुंदा : नाही. घरींच राहणार आहें मी.

आई : येणार आहेत का अनिरुद्ध आज ?

कुंदा : ते नाही यायचे. सदा कदा काम. आई—( थांबते आणि पुढचं बोलणं सोडून देते. आई आणि काका खेळांतच गढलेले असतात. )

काका : हें पहा, सगळीं घरं बंद. आता नाही राजा हलूं शकत. झाली मात. बेबी–चुकलों–सुषमाताई, मी जिंकलों.

बेबी : ( हस्तांदोलनासाठी हात पुढे करून ) मी तुमचं मनः-पूर्वक अभिनंदन करतें.

काका : ( हस्तांदोलन करून ) सुषमाताई, मी तुमचा फार आभारी आहें. ( कुंदा येऊन पटावरचा डाव न्याहाळत उभी राहते. )

काका : आजचा दिवस खूप सुखांत गेला.

कुंदा : रोजच्याच सारखा गेला, आणखी काय ! त्यांत कांही बदल झाला असता तर कांही विशेष होतं. कशांत सुख आहे काका ?

काका : सुख कशांत आहे ? ( दिवसभराचा आपला कार्यक्रम आठवतात. ) सकाळीं आम्ही फिरायला गेलों होतों. आल्यावर चहापाणी, नंतर तुझ्याशीं अन् बेबीशीं कॅरम खेळलों—

कुंदा : यांपैकी कशांत सुख आहे ?

काका : आजकाल तूंहि अगदी फिलॉसॉफर बनूं लागली आहेस. अग, सुख म्हणजे काय यावर तुम्ही विचार करायला सुरवात केली की झालंच सुखाचं दु:खांत रूपान्तर. आमचा सगळा जन्म सुखांत गेला. पण सुख म्हणजे काय यावर आम्ही कधी विचारच केला नाही.

कुंदा : सगळा जन्म सुखांत गेला ? ( बेबी आंत निघून जाते. )

काका : अग, अशा संसारांतल्या अडचणी तर येतच असतात. दुखणींबहाणीं, तुम्हा लोकांच्या शिक्षणाची व हिताची चिंता— अं, पण एकंदरींत सुखीच. नाही म्हणायला आयुष्यांत एकदा एकावर एक अडचणी कोसळत गेल्या होत्या. ( आई बुद्धिबळाच्या गोटया व पट उचलून ठेवते. व एका खुर्चीवर पुस्तक वाचत बसते. ) आमच्या जीवनाची सुरवात होती किंवा त्याहि पूर्वीचा काळ होता म्हण. मी मेडिकलूच्या फिफ्थ इयरला होतों. नापास झालों त्या वर्षी. कां ठाऊक आहे का ? आईला विचार तुझ्या कां तें.

आई : मुलांच्या समोर असं बोलूं नये.

कुंदा : सांगा काका तुम्ही.

काका : प्रेमापायीं आपली जबाबदारी विसरलों आणि झालों परीक्षेत नापास. झालं; वडीलहि वारले त्याच वर्षी. घरची स्थिति कांही ठीक नव्हती. बाबा वारल्यावर आईचंहि मन खचलं. आणि माझं तर आणखी दोन वर्षं शिक्षण व्हायचं होतं. आणि सगळयांत मोठी भीति ही होती की आता शिक्षण बंद करावं लागणार—आणि पहा, तुझी आई परवानगी देत असेल तर पुढचं सांगतों.

कुंदा : सांगा काका तुम्ही.

काका : तुझ्या वडिलांचं तुझ्या आईशीं लग्न होतं की मोडतं ही सगळयांत मोठी भीति होती.

( सर्वजण हसतात. आईच्या चेहऱ्यावर थोडंसं स्मित झळकतं. )

काका : बरं, नुसती अपयशंच आलीं असं नाही, तर प्रकृतिहि ढासळली. पण तुझ्या आईचं प्रेमहि चांगलंच खंबीर ! दुसऱ्याशीं लग्न करून तिला सुखाचा सोपा मार्ग पत्करतां आला असता. पण नाही. हटवादीपणानं तुझ्या आईनं स्वतःवर हालअपेष्टा ओढवून घेतल्या. पण तोहि काळ गेला. आणि आज असं म्हणायची वेळ आली आहे

की तेव्हाच—त्या कठिण परिस्थितींतच—तुझ्या आईनं फार मोठ्या सुखाचा भरभक्कम पाया घातला. तुझ्या आईचं महत्त्व मला क्षणभरहि विसरतां आलं नाही.

कुंदा : जन्मभर सुखी राहिलीस तूं आई ?

आई : कुंदा, काय झालंय तुला ? आज असे प्रश्न कां विचारते आहेस तूं ?

कुंदा : आई, माझं मन अलीकडे जरा अस्वस्थ झालं आहे. पूर्वी स्वतःच्या आयुष्याबद्दल मी कधी विचारच नाही केला, पण आता करणार आहे.

काका : तुझं मन अस्वस्थ झालंय ही गोष्ट मला नाही सांगितलीस तूं ? काय होतंय तुला ! (कुंदा कांहीच बोलत नाही.) तुझ्या जिवाला बरं नसावं हें मी तेव्हाच ओळखून चुकलों होतों. तुझा चेहराच सांगत होता तें. मी तुझ्या आईला म्हणालों सुद्धा होतों. पण ती उलट मलाच म्हणाली की तुमचं असंच आहे. एवढंसं कांही झालं की तें तुम्हाला खूप वाटतं !

कुंदा : (स्मित करीत) खरंच तर आहे काका. मी म्हणालें की माझं मन अलिकडे जरा अस्वस्थ झालंय. तर लगेच तुम्हाला वाटलं की पोरीला काय झालं अन् काय नाही !

काका : बरं बोवा राहिलं. आता सांग पाहूं, तुझं मन अस्वस्थ कां झालंय तें ?

कुंदा : तें मी मग सांगेन. आई, मला प्रथम हें सांग, तूं जन्मभर सुखी राहिलीस ?

आई : पूर्णपणें जरी नाही तरी बरीच सुखी राहिलें मी.

कुंदा : तूं पूर्णपणें सुखी नव्हतीस तर ?

आई : पूर्णपणें सुखी कोणीच नसतं कुंदा.

कुंदा : मला सर्वसाधारण नियम नको सांगूस आई. मला हें सांग की तुला दु:ख कशाचं होतं?

आई : दु:ख नव्हतं ग. कुटुंबाची सगळी जबाबदारी मी आपल्यावर घेतली होती. त्यामुळे मन पुष्कळदा विवंचनेंत राही.

काका : हें आजपर्यंत कां नाही सांगितलंस मला? मी पत्करली असती जबाबदारी.

आई : आपल्या मागे बाहेरचे पुष्कळ व्याप होते.

काका : पण आता तर पेन्शन घेऊन बसलों आहे नं.

आई : पण आता जबाबदारीपेक्षा विवंचनाच राहिली आहे.

कुंदा : आई, कशाच्या विवंचनेंत आहेस ग तूं?

काका : हं, उघड आहे. अग आपला अविनाश विलायतेंत आहे. युद्धाच्यामुळे तेथली परिस्थिति अगदी धोक्याची होऊन बसली आहे. केव्हा काय होईल ह्याचा नेम नाही. अवि प्रत्येक पत्रांत लिहितो आहे की मी अगदी सुरक्षित आहे. त्याच्या जिवाला मुळीच धोका नाही. पण आईचं अंतःकरण आहे तें. नाही नाही त्या कल्पना येत असतील मनांत.

आई : त्याचा जीव धोक्यांत नसला तरी काय झालं. विवंचना करण्यालायक आणखी पुष्कळ गोष्टी असतात. कुंदा, तूं आणि अविनाश आता दोघंहि वयांत आलां आहांत. ह्या वेळेला तुमच्या आयुष्याला योग्य वळण लागलं तरच तुमचं जीवन यशस्वी होईल.

कुंदा : मी तर इथे तुमच्या प्रेमछत्राखाली आहे. येऊन जाऊन दादाचीच काळजी की नाही! आई, तूं बिलकूल काळजी करूं नकोस. तुला विचारल्याशिवाय दादा कोणच्याहि मुलीशीं लग्न करणार नाही. आणि त्याच्या नोकरीचं पहायला काका आहेतच.

आई : अलीकडे तुझ्याबद्दलच्या विवंचनेनं माझं मन अस्वस्थ झालंय.

कुंदा : माझ्याबद्दल ?

आई : हो. तुला जपायला हवं. तूं अजाण आहेस कुंदा.

कुंदा : साफ खोटं आहे. माझ्यासारखी सुज्ञ मुलगी तुला लाभली हें भाग्य समज.

आई : तेंहि खरं आहे. पण हें वयच असं आहे की स्वत:चीच नीट ओळख करून घ्यायला तुला पुरेशी सवड मिळणार नाही. मी तुला ओळखायला हवं अन् जपायला हवं.

कुंदा : कांही तरी संशय आलेला दिसतोय तुला.

आई : तुझं मन कुठे वहावत चाललं आहे तें मला दिसतंय. वेळींच जपायला हवं तुला.

कुंदा : ठीक आहे. मलाहि ठेव बंधनांत. तुला मी कुक्कुलं बाळ वाटतें. सांगत जा रोज, मी काय करायला हवं आणि काय नको तें. (रागावून जिना चढूं लागते.)

आई : अशी रागावूं नकोस कुंदा. तुझ्यावर जुलूम का करतें आहे मी ?

कुंदा : तुझा माझ्यावरचा विश्वासच उडून गेला आहे. मग पुढचं बोलणंच खुंटलं. (निघून जाते).

काका : पण आज तुझ्या मनांत असे विचार कां आले ?

आई : कुंदाबद्दल विचार करण्याची आता वेळ येऊन चुकली आहे. आपण जर दुर्लक्ष केलंत तर तें ठीक होणार नाही. कुंदाचं वर्तन जरा बारकाईनं पहा.

काका : पहातों तर आहें. काय वावगं आहे त्यांत ?

आई : वावगं कांहीच नाही. उलट सगळं नैसर्गिकच आहे. आणि मुली वयांत आल्यावर हें असंच व्हायचं.

काका : असं म्हणजे कसं !

आई : तुम्ही तिच्याशीं इतक्या मोकळेपणानं बोलतां. पण तुम्ही तिच्या मनाचा ठाव घेतलेला दिसत नाही. काय कयास आहे तुमचा तिच्याबद्दल.

काका : आज ती म्हणाली की तिचं मन स्वस्थ नसतं म्हणून. माझ्या लक्षांत आली होती ती गोष्ट. आणि मी तुला सांगितलीहि.

आई : ती इतका वेळ आपल्या खोलींत बसलेली असते. तुम्हाला काय वाटतं की सगळा वेळ अभ्यास करीत असते ? अभ्यास गुंडाळून ठेवला आहे तिनं. यंदाहि एम्. ए. च्या परीक्षेला बसण्याचा तिचा विचार दिसत नाही.

काका : मग न बसेना का परीक्षेला. त्यांत काय बिघडलं ? केवढ्या कोवळ्या वयांत ती बी. ए. झाली ! सारखं अभ्यासाच्या ओझ्याखाली मन दडपून टाकण्यांत काय अर्थ आहे ! यंदा नाही पुढच्या वर्षीं बसेल एम्. ए. ला. आजकाल तिला खूप नाचावं, बागडावं, खेळावं, हिंडावं व चैन करावी असं वाटतंय. त्यांत काय बिघडलं ?

आई : बिघडलं कांहीच नाही. योग्य वेळीं वृत्ति बहरून यायचीच. तारुण्याचं नवचैतन्य अंगीं संचार करतंय. खोलींत बसल्या बसल्या काय करीत असते तें मी नीट न्याहाळून पाहिलं.

काका : मी सुद्धा तर पाहिलंय. आरशासमोर उभी राहून तासचे तास आपलं रूप न्याहाळते. सौंदर्यप्रसाधना हा तिचा दिवसभराचा उद्योग होऊन बसला आहे. दहादा केशभूषा अन् वेषभूषा बदलते. ब्लाउज, झंपर अन् पातळं यांनी कपाटंचीं कपाटं भरून गेलीं आहेत तिचीं. टेबलावर तर प्रसाधनेच्या साहित्याची अगदी रेलचेल झालेली आहे. आणि वेणीचा शेपटा चाळवत अन् गाणं गुणगुणत सारखी खोलींतल्या खोलींत बागडते. तूं सुद्धा असंच केलं असशील.

आई : सगळेच जण करतात.

काका : बरं मग ?

आई : कुंदाचं निरीक्षण बरोबर केलं तुम्ही. आता आपण काय करायला हवं असं वाटतं तुम्हांला ?

काका : असं विचारतेस होय? त्यापेक्षा आता तिच्या लग्नाचं पहा असं सरळच कां नाही सांगितलंस ? तेवढयाकरता केवढी लांबलचक प्रस्तावना जोडलीस. तसंच असेल तर लागूं आपण वरसंशोधनाला.

आई : तुम्हाला काय वाटतं की तुम्ही वर शोधून आणलांत की कुंदा चटकन् त्याला माळ घालायला तयार होईल ?

काका : तिच्या पसंतीच्या मनुष्याशींच जमवून देऊं.

आई : तसं करावंच लागणार आहे. अनिरुद्धाच्याकडे तिचं मन किती ओढलं जातंय, माहीत आहे तुम्हाला ?

काका : अनिरुद्धावर प्रेम आहे तिचं ? मला वाटलंच होतं तसं. तूं जर ही गोष्ट काढली नसतीस तर मीच सांगणार होतों हें तुला. तुला काय वाटतं की तिनं अनिरुद्धावर प्रेम करूं नये? म्हणूनच तूं तिच्यावर बंधनं घालणार होतीस ?

आई : बंधनं घालून ओढ कमी करतां येत नाही. उलट तसं करण्याने छळ मात्र केला जातो. तिचं अनिरुद्धावर प्रेम आहे ही गोष्ट माझ्या लक्षांत येतांच मला हेंहि कळून चुकलं की माझ्यावरहि कांही जबाबदारी आहे. योग्य तेंच होईल ह्याबद्दल मला खबरदारी घ्यायला हवी.

काका : कुंदाचं अनिरुद्धावर प्रेम करणं तुला पसंत नाही ? तिनं त्यांच्यावर प्रेम करूं नये असं वाटतं तुला ?

आई : तिनं कुणावर प्रेम करायला हवं हें आपण ठरवण्यांत कांही अर्थ नाही.

काका : तुझ्या म्हणण्याचा अर्थच लक्षांत येत नाही माझ्या. कां घालायचीं कुंदावर बंधनं ? तिनं अनिरुद्धाला भेटूं नये असं वाटतं तुला ?

आई : त्याला माझी हरकत नाही. त्यांचं प्रेम असलं तरी आणि नसलं तरी, कुंदाला वाईट परिणाम भोगावे लागतां कामा नयेत. हीच आपल्यावर जबाबदारी आहे.

काका : अजून कांही तुझ्या म्हणण्याचा रोख माझ्या लक्षांत आला नाही.

आई : अनिरुद्धाचं कुंदावर प्रेम आहे असं वाटतं तुम्हांला !

काका : कांही सांगतां येत नाही बोवा.

आई : मला सुद्धा शंका वाटते. गेल्या किती तरी दिवसांत अनिरुद्ध एकदाहि इकडे फिरकले नाहीत. त्यांना येण्याबद्दल बरीचशीं बोलावणींहि गेलीं. पण ऐकतें की कामामुळं त्यांना इकडे यायला सवडच होत नाही. कुंदाचं मन त्यांच्याकडे ओढ घेतं. संध्याकाळ झाली की त्यांना भेटायला जाण्यासाठी कुंदा माझी परवानगी मागते. आणि तिचं मन मोडणं माझ्या जिवावर येतं. रोज मी कुंदाला सांगतें की अनिरुद्धांनाच इथे घेऊन ये म्हणून. तास दीड तासाने ती परत येते आणि अनिरुद्ध यायला तयार झाले नाहीत म्हणून सांगते. परवा सांगत होती की अतिरिक्त श्रम व चहासिगरेट यांच्यापायीं त्यांची प्रकृति फार खालावली आहे. काल कुंदा जायला निघाली तेव्हा मी तिला सांगितलं की अनिरुद्धांना रात्रीं इकडेच जेवायला घेऊन ये. विश्रांतिकरता इथेच आपल्या घरीं आठ दिवसाकरता त्यांना ठेऊन घेण्याचा माझा विचार होता. काल रात्रीं कुंदा परत आली ती जराशी चिडूनच. मी तिला विचारलं, का ग, आले नाहीत अनिरुद्ध ? चिडून उत्तर दिलं तिनं की वेड लागलंय त्यांना. सदा कदा काम काम काम आणि त्या आनंदरावांच्या समोर जगांतले सगळे जण तुच्छ आहेत त्यांना.

काका : कोण आहेत हे आनंदराव ?

आई : अनिरुद्धांचे जीवश्चकंठश्च स्नेही आहेत. त्यांच्या

वर्तमानपत्राची कचेरी चालवतात ते. अनिरुद्ध अन् आनंदराव दोघेच जण रहाताहेत तिथं.

[ शरद् भीत भीत दारांत येतो व तेथेच जरा घुटमळतो. आज स्वारीचा पोषाख थोडा अधिक टापटिपीचा आहे.]

काका : (शरद्‌ला पाहून) कोण पाहिजे तुम्हाला ?

शरद् : डॉक्टर साठयांची वडील मुलगी, त्या एम्. ए. ला शिकताहेत, कुमारी कुंदाताई साठे—त्या आहेत कां ?

काका : हो आहे.

शरद् : फारसं नाही तरी बरंचसं महत्त्वाचं काम होतं त्यांच्याशीं. त्या जरा भेटतील तर--

[ काका कुंदाला लागोपाठ दोन तीन हाका मारतात. कुंदा जिन्यांत येते. ]

कुंदा : ( शरद्‌ला पाहून ) कोण शरद् ? तुम्ही आज इकडे आलांत ? ( जिना उतरून खाली येते. शरद्‌च्या येण्यानें ती जरा उल्हसित झालेली आहे. ) काका, हे किनई अनिरुद्धांचे अगदी जीवश्चकंठश्च मित्र आहेत. अनिरुद्धांची आणि यांची माझ्याशीं पहिली भेट एकाच वेळीं अन् एकाच ठिकाणीं झाली होती. हे आजपर्यंत आपल्या घरीं कधीच आले नाहीत. मी यांना पुष्कळदा बोलावलं होतं. कालतर जेवायलाहि बोलावलं होतं. पण यांचं की नाही आपल्या बायकोवर भारी प्रेम आहे. तिचे स्वयंपाकाचे श्रम फुकट जातील म्हणून यांनी आमंत्रणाचा स्वीकार केला नाही. आणखी एक गंमत सागतें यांची. यांना फार हसण्याची सवय आहे.

शरद् : कुंदाताई, मी वाक्यागणिक हसतों म्हणून माझ्या बोलण्यांतल्या गांभीर्याकडे कुणी लक्षच देईनासं झालं आहे. (कुंदा

हसते.) मी कांहीहि बोललों तरी तुम्हा लोकांना तें हसण्यावारीच न्यावंसं वाटतं. इतका का हास्यास्पद आहे मी ?

कुंदा : बरं आता नाही हसणार.

शरद् : तसंच मी म्हणतों की मूर्खपणालाहि आयुष्यांत महत्त्व आहे म्हणून माझी मूर्खांतच गणना करून टाकली आहे. (काका हसतात आणि नंतर कुंदाहि हसते.)

कुंदा : कोण समजतं तुम्हाला मूर्ख ? कोण नाही देत तुमच्या बोलण्यांतल्या गांभीर्याकडे लक्ष ?

शरद् : काकासाहेब, कालचीच गोष्ट सांगतों तुम्हाला. कुंदाताईच्या प्रमाणेच मीहि अनिरुद्धाला आता विश्रांति घ्यायला लावायचीच ह्या हेतूनं त्याच्याकडे गेलों होतों. पण माझ्या सगळ्या बोलण्याला त्या आनंदानं मूर्खपणांत जमा केलं आणि अखेर अनिरुद्धानंहि तें मान्य केलं नाही. तो आनंद तर एक शब्द नाही बोलूं देत मला.

काका : आनंदरावांना तुम्ही चांगल्या तऱ्हेनं ओळखतां ?

शरद् : न ओळखायला काय झालं ? चांगलाच ओळखून आहें मी त्याला. (हसतो) जन्माच्या दोन महिने पूर्वी बाप वारला अन् जन्मानंतर दोन महिन्यांनी आई वारली. स्वभाव पहिल्यापासून घालमेली. हजार भानगडींत असे स्वारी. त्यापायींच शिक्षणाचा पुढे बाजा वाजला.

काका : काय करत होते पूर्वी ?

शरद् : एकना दोन, हजार धंदे केले असतील. आमच्याच इथे अनिरुद्धाची अन् त्याची ओळख झाली. ती पुढे इतकी वाढली की ते दोघेजण झाले एक अन् मी मात्र अनिरुद्धाला दुरावलों. स्वतः आनंदाने केले आहेत हजार धंदे. त्याला नाही कशाचा विधिनिषेध. त्याने स्वतः कधी कुणाची जबाबदारी पत्करली नाही. तीस वर्षांचं वय

झालं पण म्हणतो लग्न हवं कशाला? अनिरुद्धाच्या सत्प्रवृत्तीबद्दल त्याच्या वैऱ्यालाहि शंका घेतां यायची नाही. पण दिवसेंदिवस आनंदाची त्याच्यावर अधिकाधिक छाप पडून राहिली आहे.

काका : मला एकदा आनंदरावांना प्रत्यक्ष भेटायचं आहे. अनिरुद्धानं विश्रांति घेण्याच्या बाबतींत तुमच्या दोघांचं ऐकलं नाही नं! ठीक आहे. मी लावतों त्यांना विश्राति घ्यायला. आणखी काय हवं? तुम्हांला तुमचा जुना जीवश्चकंठश्च मित्र आनंदरावांच्या तावडींतून सोडवून परत हवा? अन् तुला ग काय हवं कुंदा?

कुंदा : मला कांही नको.

शरद् : काकासाहेब. कालपर्यंत मला वाटत होतं की हें काम काय, अगदी सोपं आहे. नुसता आग्रह करण्याचा उशीर की अनिरुद्ध श्रमांचा अतिरेक थांबवेल. पण त्याची महत्त्वाकांक्षा अगदी भडकलेली आहे. आणि क्षणाक्षणाला आनंद त्याची महत्त्वाकांक्षा आणखी भडकवतो आहे. अनिरुद्धाच्या बरोबर त्याचंहि महत्त्व दिवसेंदिवस वाढत जातंय ना. आणि काकासाहेब, ह्या महत्त्वाकांक्षेला कांहीच मर्यादा नाही. अनिरुद्धाला दिगंत कीर्ति हवी. अन् आनंदानं त्याकरता अगदी कसून चंग बांधला आहे. त्यांनी राजकारणांत हजार उलाढाली सुरू केल्या आहेत. त्याशिवायच का अनिरुद्धाला पुढारीपण मिळणार आहे? पण ही महत्त्वाकांक्षा एवढ्यावरच कुठे थांबते आहे? (उपहासाने) अनिरुद्धाला शाश्वत कीर्ति हवी आहे! अजरामर कीर्ति हवी आहे! अजरामर होईल, अद्वितीय म्हणून गाजेल आणि अक्षर वाङ्मयांत जमा होईल असा तत्त्वज्ञानावरचा ग्रंथ त्याला निर्माण करायचा आहे! कार्ल मार्क्सवर त्याला मात करायची आहे!

काका : तुमचं अनिरुद्धावर अतिशय प्रेम आहे असं म्हटलं पाहिजे. त्यांच्यावर तुम्ही टीका करायला गेलांत अन् त्यांची बेफाम

स्तुतिच केलीत. अनिरुद्ध इतके महत्त्वाकांक्षी आहेत व महत्त्वाकांक्षा तडीस नेण्याकरता भगीरथ प्रयत्न करताहेत हें ऐकून मला तर अतिशय आनंद झाला. तें कांही नाही. मी सुद्धा त्याला प्रोत्साहन देणार.

कुंदा : काका, असं उत्तेजन देऊनच तुम्ही सुद्धा त्यांना बिघडविण्याच्या कामगिरींत भाग घेतलेला आहे. तुम्हीहि त्यांचं मन भडकवलेलं आहे. आणि खरी वस्तुस्थिति तुमच्या लक्षांत आली नाही म्हणून तुम्ही अजूनहि थट्टेवारी नेतां आहांत.

काका : अरे वा, आता तर तूं माझ्यावरहि आरोप करायला लागलीस.

कुंदा : (जरा काकुळतीला येऊन) काका, खरंच प्रकरण अतिरेकाला जातं आहे हो, काल मी किती शिकस्त केली; पण त्यांनी माझं सुद्धा ऐकलं नाही. आनंदरावांच्या शिवाय बाकी सगळेजण अगदी तुच्छ आहेत त्यांना. माझ्या आग्रहानं ते काम बंद करायला तयारहि झाले असते. पण आनंदरावांच्या प्रोत्सहनामुळे पुन: मूळपदावर येतात.

काका : प्रोत्साहन देणारंहि तर कुणी हवंच ना? आनंदराव ती कामगिरी करताहेत. इतका कां तुझा त्यांच्यावर रोष?

कुंदा : आनंदरावच काय, पण तुम्ही सुद्धा तशाच प्रोत्साहनापायीं त्यांना या मार्गाला लावलं आहे.

काका : काय केलं मी?

कुंदा : आठवा तुम्हीच. तीन वर्षांपूर्वीच तुमची अन् अनिरुद्धांची ओळख झाली काय निदान केलं होतं तुम्ही? आणि कोणती उपाययोजना केली होती?

काका : त्यांच्या आईला तेव्हा एका अज्ञात भीतीनं ग्रासलं होतं. अनिरुद्धाचा नाश होणार अशीं भयानक स्वप्नं तिला पडत असत. अनिरुद्धांच्याहि संस्कारक्षम मनावर तिच्या स्वप्नांचा परिणाम झालेला

दिसत होता. त्यावर इलाज म्हणून मी त्यांना म्हणालों होतों की आपलं जीवित काळवंडून जाईल अशी भीति कां वाटावी तुम्हाला? अहो, तुम्ही जाल तिथे आपल्याबरोबर प्रकाश न्याल. त्यांच्या प्रोत्साहनाकरता मी अजूनहि नेहमी असं म्हणतों. ते खूप कर्तबगार आहेत हें मी त्यांना नेहमी बजावत असतों. तें ऐकून त्यांचं मन अतिशय उत्तेजित होतं.

कुंदा : अन् म्हणूनच मी म्हणतें की तुम्ही त्यांना बिघडवलं.

काका : मोठी शहाणीच की नाही! तुला काय वाटतं की अनिरुद्धांनी सगळ्या महत्त्वाकांक्षा सोडून द्याव्या अन् बसावं रिकाम-टेकड्यासारखं शिळोप्याच्या गप्पा मारत? अन् ते तसं करत बसले म्हणजे तुला त्यांची एवढीहि पर्वा करावीशी वाटणार नाही. नको तें तुम्ही मागणार आणि मिळालं म्हणजे मग बेपर्वा बनणार. मी नाही त्यांचं पाऊल मागे ओढणार.

कुंदा : (अधिक काकुळतीला येऊन) खरंच कसं सांगूं तुम्हाला काका?

काका : (प्रेमळपणें) तूं आता कांही सुद्धा सांगायला नको कुंदा. तुझं अंत:करण मी ओळखलं नाही असं वाटतं तुला?

कुंदा : कांही नाही ओळखलंत तुम्ही!

काका : सांगूं का काय ओळखलं आहे तें?

कुंदा : कांही नको. सगळं थट्टेवारी नेतां तुम्ही.

काका : पहा शरद्, तुमच्याप्रमाणे माझीहि गत होऊं लागली. मी गंभीरपणें बोललों तरी हिला थट्टाच वाटते.

कुंदा : खरंच सांगतें काका, कोणत्याहि भयंकर व्यसनासारखं आहे हें त्यांचं व्यसन. अन् मला तर वाटतं की अतिरिक्त मानसिक श्रमांच्यामुळे त्यांना निद्रानाशाची व्याधि जडली आहे. रात्रीं बाराला तें काम आटोपतात अन् अंथरुणावर जाऊन पडतात. नंतर डोकं

भ्रमण करूं लागतं, कपाळ, डोळे, हातापायांचे तळवे यांची आग होऊं लागते, तगमग वाढते. आणि म्हणाले, की नाही नाही ते विचार मनांत थैमान घालूं लागतात. म्हणून पुन: उठतात, चहा पितात अन् कामाला लागतात. कामाला लागले म्हणजे सगळ्या व्याधींचा विसर पडतो म्हणे. त्यांची प्रकृति पहा तुम्ही काका, म्हणजे मग येईल तुमच्या लक्षांत.

काका : अशी स्थिति आहे म्हणतेस ?

कुंदा : तुमची शपथ काका, खोटं नाही सांगत मी. त्यांना आता कामापासून परावृत्त केलंच पाहिजे.

काका : ठीक आहे. शरद्, तुम्ही जाऊन अनिरुद्धांना घेऊनच या इथे.

शरद् : पण माझं तो ऐकेल तेव्हा नं ! आनंद तर एक शब्द बोलूं देत नाही. काकासाहेब, तुम्ही कुंदाताईंना पाठवा. मला तर झिडकारूनहि लावतील. तुम्ही चला नं कुंदाताई !

कुंदा : (जरा घुटमळते) पण–(थोडा वेळ थांबून) पण मी कशी जाऊं ? आई नाही म्हणेल. तुम्हीच जा शरद्.

शरद् : पण माझ्याच्याने तें काम होईल की नाही शंकाच आहे.

[ बेबी परत येते. ]

कुंदा : आई, सांग नं ग, जाऊं का मी ? तसे अनिरुद्ध नाही यायचे.

आई : किती उतावळ्यासारखं करतेस कुंदा !

कुंदा : तुझं आपलं सदा असंच. सांग नं ग, जाऊं का मी ?

आई : बरं जा. शरद् तुम्ही जा कुंदाबरोबर आणि काय वाटेल तें करा पण अनिरुद्धांना ताबडतोब घेऊन या इथे. मी अगदी निकडीनं

आताच्या आता बोलावलं आहे म्हणून सांगा. आणि म्हणा, न आलांत तर तें ठीक नाही होणार.

कुंदा : (घाईघाईने चपला चढवते व जायला तयार होते) चला शरद्. (उल्हसित होऊन) आई, जाते अं मी.

काका : अग कुंदा,

कुंदा : काय काका ?

काका : बाहेर जाते आहेस तूं. बाहेर जाण्यापूर्वी अर्धा तास सौंदर्यप्रसाधन नको का करायला ?

कुंदा : कांही नको. मी आहे तशीच ठीक आहे. चला हो शरद्. (शरद् अन् कुंदा जातात.)

बेबी : काका, कुंदाताई अगदी एखाद्या लहान मुलासारख करते, नाही !

आई : हो का आजीबाई ?

बेबी : मी तेव्हाचा विचार करते आहें की ह्या ताईला झालंय तरी काय ! एखाद्या लहान मुलासारखं वागते ती.

काका : मला वाटतं की आमच्या सुषमाताई जरा मोठ्या झाल्या की त्यांनाहि अगदी असंच एखाद्या लहान मुलासारखं करावंसं वाटेल. आणि मग आम्ही आमच्या सुषमाताईंना नवरा शोधून आणून देऊं. मग पुन: त्या मोठ्यासारखं वागतील.

बेबी : खरंच, ताईचं अनिरुद्धांशीं लग्न होणार आहे का हो ?

आई : काय वाटतं तुम्हाला ? केला तुम्ही कुंदाच्या मनःस्थितीचा अंदाज ?

काका : अंदाज तो काय करायचा आहे. तिचं अनिरुद्धावर प्रेम आहे हें निश्चित. आणि ती भावी आयुष्याबद्दल विचार कां करूं

लागली आहे, अन् आपल्याला तिनं मघाचे प्रश्न कां विचारले–सगळं आलं माझ्या लक्षांत. आणि तिचं मन अस्वस्थ कां होतं तेंहि कळलं.

आई : कां अस्वस्थ होतंय असं वाटतं ?

काका : मनुष्य आपल्या भावी कालाबद्दल विचार करूं लागला म्हणजे असंच होतं. संक्रमणकालांत अस्वस्थताहि जाणवतेच. मग आपण अधिक सुखमय स्थितींत का जात असेना.

आई : अलीकडे मलांहि बरीच हुरहूर जाणवत असते. मन उद्विग्न होतं वारंवार. ( बेबी निघून जाते.)

काका : हो का ? शरीरप्रकृतींत बिघाड झाल्यानंहि होतं असं वारंवार. कांही नाही, पचनक्रियेवर इलाज केला की आपोआप होईल नाहीसं.

आई : तसं नाही. सारखं कुंदाबद्दल माझं मन विचार करीत असतं. काल रात्रीं त्यामुळे मला झोपहि आली नाही धड. राहून राहून कशाची तरी भीति वाटत राहते.

काका : कशाची भीति वाटते ?

आई : तेंच नीटसं कळत नाही.

काका : अज्ञात भीति ! तुम्हीहि ह्या अज्ञात भीतीला वेळींच पायबंद घाला. नाहीतर कारण काहीच नाही आणि आपण वृथा विवंचना करत अर्ध्या होणार.

आई : तुम्हाला काय वाटतं की अनिरुद्धांचं कुंदावर प्रेम आहे ?

काका : कळेलंच तेंहि वेळ आली म्हणजे. कुंदा तुझी मुलगी आहे. वाटेल त्याला मोहून टाकील.

आई : मग कुंदा त्यांना इतका आग्रह करत असतांना कां नाही येत ते ? कुंदाचं मन मोडणं कसं होतं त्यांच्याकडून ? की त्यांचं अंतःकरणच कठोर आहे ?

काका : अग, त्यांचं अंतःकरण कठोर असतं तर कुंदाचं मन तरी त्यांच्याकडे आकर्षित झालं असतं कां ? आणि मन आकर्षित झाल्यावर जर तिला त्यांचा कठोरपणा कळून आला असता तर आता ती रडत बसली असती. अशी उतावळेपणानं धावत नसती गेली त्यांच्याकडे.

आई : हे झाले नुसते तर्क !

काका : आणि तुझ्या झाल्या . नुसत्या शंका-कुशंका. (व्हरां-ड्यांत चाहूल येते). आले वाटतं. (अनिरुद्ध, कुंदा व शरद् येतात). या अनिरुद्ध. तुमच्या येण्याबद्दल सगळेजण साशंक होते. खात्री फक्त मलाच होती. अनिरुद्ध, मला की नाही, तुमचं काळीज तपासून पहा-यचं आहे.

शरद् : त्याला काळीज तरी आहे का ते पहा आधी. (हसतो)

काका : शरद्ना वाटतं की तुम्हाला काळीजच नाही. कुंदाच्या आईला वाटतं की तुमचं काळीज फार कठोर आहे. तुला ग काय वाटतं कुंदा यांच्या काळजाबद्दल ?

कुंदा : तुम्हीच पहा !

काका : ठीक आहे. तुला काय हवं आहे तेंहि शोधून पहातों यांच्या काजळांत.

अनिरुद्ध : पण माझ्या काळजाबद्दल शंका कुशंका येण्याचं कारण ?

काका : तुम्हाला इतकीं बोलावणीं गेलीं. कुंदानं इतका आग्रह केला. पण तुम्ही येण्याचं नांव नाही.

अनिरुद्ध : काकासाहेब, वेळ फार अपुरा पडतो हो. नाही तर सगळे व्याप बरोबर पाळले जाणार नाहीत. यांचं मी मन मोडतों खरं. मला त्याबद्दल वाईट वाटतं. पण इलाज नसतो.

काका : तेंच तर मी यांना सांगत होतों. पण अनिरुद्ध, यांच्या-पैकी प्रत्येकाला वाटतं की आपल्यालाच तेवढी अनिरुद्धांची काळजी आहे अन् मीच मात्र अगदी बेपर्वा आहे. ही कुंदा तर क्षणाक्षणाला माझ्यावर बेपर्वाईचा आरोप करूं लागली आहे.

कुंदा : हे हो काय काका, मी केव्हा म्हटलं ?

आई : अनिरुद्ध, तुमच्या आरोग्याची काळजी वाहणारं मायेचं माणूस तुमच्या घरांत कोणीच नाही अन् तुम्ही सुद्धा आपल्या प्रकृतीची नीट काळजी घेणं सोडलंत. हें असं करून कसं चालेल? प्रकृति नीट असेल तर सगळं कांही ठीक. प्रकृति चांगली ठेवाल तर हातून कामंहि होतील.

अनिरुद्ध : हं, उपचार सुरू करणार आहे मी लवकरच.

आई : मी तुम्हाला कांही म्हटलं तर ऐकाल माझं ?

अनिरुद्ध : तीन वर्षांपासून ओळखतां आहांत मला. असं झालंय का कधी की तुम्ही म्हणालांत अन् मी ऐकलं नाही ?

आई : इथे रहायला या तुम्ही. घरीं नाही व्हायचं तुमचं औषधपाणी नीट.

अनिरुद्ध : तसं कांही नाही. आनंद पाहून घेईल सगळं.

शरद् : आनंद! आनंद! आनंद! आनंद म्हणजे याचं सर्वस्व आहे!

अनिरुद्ध : पण तूं कां त्याचा इतका मत्सर करतोस?

शरद् : मी कशाला मत्सर करूं? मत्सर करणारीं माणसं वेगळीं आहेत. (हसतो.) पण त्याचं इतकं स्तोम माजवलेलं मला नाही बरं वाटत.

अनिरुद्ध : तुला कल्पना नाही शरद्, त्यानं माझ्यासाठी आज-पर्यंत काय काय केलं आहे ह्याची. माझ्या हातून इतपत कामगिरी होऊं

शकली अन् भवितव्याबद्दल चांगली आशा वाटूं लागली, हें सगळं त्याच्यामुळे.

काका : उगीच नाही तुमचं त्यांच्यावर इतकं प्रेम. एकदा आनंदरावाशीं ओळख करून घेतली पाहिजे. अनिरुद्ध, मी त्यांनाहि बोलावून घेतों. अरे विठू—

अनिरुद्ध : तो घरींच नव्हता. भेटणार नाही तो.

शरद् : भेटेल कुठून तो! त्याचीं भेटायचीं स्थळं अनिरुद्धाला कुठून माहित असणार आहेत? (हसतो)

अनिरुद्ध : तुला माहित आहेत नं?

शरद् : पण मला आता कोणत्याच स्थळाशीं कर्तव्य नाही. (हसतो.) आनंद तरुण आहे हें विसरूं नकोस. आणि तुझ्यासारखं नाही त्याचं. (हसतो.)

अनिरुद्ध : काय बडबडतो आहेस तूं शरद्?

शरद् : तो स्वतःबद्दल तुला वाटतो इतका बेपर्वा नाही. एका मुलीवर प्रेम करतो आहे तो.

अनिरुद्ध : असं? मला नाही सांगितलं त्यानं कधी!

शरद् : मला तरी कुठं सांगितलं. मला डोळे आहेत. नुसतीं पुस्तकं वाचायला नाहीत. प्रत्यक्ष असल्या गोष्टी पहायला. (हसतो) असल्या बाबतींत कानाडोळा करण्याचं पाप आपण चुकूनसुद्धा करणार नाही. (हसतो)

आई : अनिरुद्ध, ठरलं तर मग. तुमचा इथेच मुक्काम आता. औषधोपचारहि इथेच चालू राहतील. आनंदरावांच्याहि मागे पुष्कळ कामं असतील. तुमच्याकडे लक्ष द्यायला त्यांना असा कितीसा वेळ मिळणार आहे? घरीं दुसरं कोणी असतं तर गोष्ट वेगळी होती.

अनिरुद्ध : तात्या चार आठ दिवसांत येणारच आहेत.

आई : ते आले म्हणजे पुढचं पुढे पाहूं.

अनिरुद्ध : पण इथे येऊन राहिलों तर कामाची हरकत होईल. आणि माझा वेळ तरी कसा जाईल ?

काका : ठीक आहे. मी सांगतों तुम्हांला मार्ग. श्रमांची तुम्ही योग्य ती वाटणी करा. आनंदरावांनी पाहावं कचेरीचं काम. तुम्ही येथून अग्रलेख लिहून पाठवावेत. आणि तें तुमचं ग्रंथ तयार करण्याचं काम आहे नं, त्या कामीं कुंदानं तुम्हाला मदत करावी. ती तुमचीं टिपणं तयार करून देईल आणि लेखनाच्या कामींहि मदत करील.

अनिरुद्ध : पण हें रूक्ष काम तिला थोडंच रुचणार आहे. ती खूप बुद्धिमान् आहे म्हणून तिच्याशीं वादविवाद करावासा मला वाटतो. पण तिची आवड वेगळी आहे. तिला तरी कशाला त्रासांत टाकतां ?

कुंदा : हें कशावरून म्हणतां ?

अनिरुद्ध : काल नाही म्हणालीस तूं ?

कुंदा : मी असं मुळीच म्हणालें नाही.

आई : आता आढेवेढे घेण्याचं कांहीच कारण उरलं नाही. तुम्हाला इथेच राहिलं पाहिजे.

काका : हं, आपण पहा आता स्वयंपाकाची व्यवस्था. अनिरुद्ध, काढा पाहूं कपडे.

अनिरुद्ध : म्हणजे, आज संध्याकाळचं जेवणहि इथेच की काय ? (कुंदा होकारार्थी मान हलवते) पण मी आनंदाला सांगितलं नाही. तो वाट पाहत राहील माझी.

शरद् : जेवणाकरता तुझी वाट पहायला कोण समजलास रे तूं आनंदाला ? (हसतो) जेवणाकरता घरीं कुणी वाट पाहत बसलं आहे ही भाषा माझ्यासारख्याच्या तोंडीं शोभते.

काका : मी निरोप पाठवण्याची सोय करतों. आणि तुम्हाला हवं असलेलं सामानहि बोलावून घेण्याची सोय करीन.

अनिरुद्ध : तुम्ही तर अगदी निरुत्तर करतां आहांत मला. पण मला कामाची इतकी सवय जडून गेली आहे की मला इथे मुळी बरंच वाटणार नाही.

कुंदा : काल तुम्ही मला तो सिद्धान्त समजावून सांगणार होतां ना ? अर्ध्यावरच सोडला तो तुम्ही.

अनिरुद्ध : अर्ध्यावर मी सोडला की तूंच विषय बदललास ?

कुंदा : शेवटीं दोष माझाच का ? छान, चांगला न्याय आहे. तरी मी दहादा तोच विषय काढत होतें आणि तुम्ही तो सिद्धान्त समजावून सांगण्याच्या ऐवजी आनंदरावांची स्तुतिच करीत होतां.

काका : कोणता सिद्धान्त म्हणते आहेस तूं ?

[ आई घरांत जाते ]

कुंदा : काल फारच अजब सिद्धान्त सांगितला यांनी. हे म्हणाले की न्यूनगंड आणि अहंकार यांच्या संघर्षातून प्रभावी व्यक्तिमत्त्व उत्पन्न होत असतं. प्रथमदर्शनीं तुम्हाला काय वाटतं काका या सिद्धान्ताबद्दल ?

काका : आपल्याला कांही मत देतां यायचं नाही. प्रथम यांनी न्यूनगंड, अहंकार, त्यांचा संघर्ष, आणि प्रभावी व्यक्तिमत्त्व या शब्दांचा अर्थ स्पष्ट करायला हवा.

कुंदा : माझं सकृत्दर्शनीं काय मत झालं तें मी सांगतें. अनिरुद्धांनी स्पष्ट केल्यावर मत बदलेल ही गोष्ट वेगळी. पण आता मला असं वाटतं की, व्यक्तिमत्त्व अव्यक्त स्वरूपांत असतं त्याचं कार्यकारण-परत्वें प्रकटीकरण होतं. तें उत्पन्न होतं असं म्हणणं ठीक होणार नाही.

अनिरुद्ध : तूं वादाला आणखी एक मुद्दा घेतलास. ठीक आहे.

उदाहरणाकरता आपण हिटलर किंवा नेपोलियन ह्या व्यक्तींचं नीट मनोविश्लेषण करून मग आपल्या सिद्धान्ताकडे वळूं.

[शरद् खूप दीर्घ जांभई देतो. सर्वजण हसतात.]

शरद् : चालूं द्या तुमचं. माझी जांभई नका घेऊं तुम्ही मनावर!

काका : मला कांही वेळ ह्या सिद्धान्तावर विचार करूं द्या. आणि जेवण झाल्यावर मग पहा भाग घेऊन मीहि वाद रंगांत आणतों की नाही तें. चला अनिरुद्ध, मी तुम्हाला तुमची खोली दाखवतों. (बोट दाखवून) ही माझी स्वतःची खोली. ही शेजारची खोली तुमची. येथे तुमची सगळी व्यवस्था करवून देतों. चला. आमची पुस्तकांची लायब्ररीहि ह्याच खोलींत आहे. पहा तुमच्या कामाचीं पुस्तकं असतील तर. (खोली उघडण्याचा प्रयत्न करतात. ती उघडत नाही.) अरे खोली तर बंद आहे. चला बाजूच्या माझ्या खोलींतून. (अनिरुद्धाला घेऊन जातात.)

शरद् : मी तुमचं अभिनंदन करतों कुंदाताई. अखेर तुम्हाला यश आलं.

कुंदा : आईनं अन् काकांनी मनावर घेतलं म्हणून झाले ते तयार.

शरद् : काय नाही करणार ते तुमच्याकरता? (हसतो.)

कुंदा : (रोषाने) माझ्याकरता काय केलं? अनिरुद्धांच्याकरता केलं म्हणा.

शरद् : पण तुमची इच्छा म्हणूनच ना? पण कुंदाताई, अनिरुद्धानं कबूल केलं आहे तरी तो इथे राहीलच आणि विश्रांति घेईलच असं कांही सांगतां येत नाही. आनंद इथे आला आणि त्यानं त्याचं डोकं पुनः भडकवून दिलं तर मग तो इथे क्षणभर थांबणार नाही. मोठं होण्याची संधि दिसली की भडकतं त्याचं मन,

कुंदा : शरद्, आनंदरावांनी त्यांच्या उत्कर्षाला हातभार लावला आहे. त्यांच्या अडचणीच्या वेळीं त्यांना साथ दिलेली आहे. एक गोष्ट सांगतें मी तुम्हांला शरद्. आज आईनं एक फार मोठं तत्त्व माझ्या मनावर बिंबवलं आहे. कुणी परिस्थितीशीं झगडत असेल तेव्हा त्याला साथ करावी म्हणजेच आपलं त्या व्यक्तीला खूप महत्व वाटतं. आपण जर अनिरुद्धांशीं तितक्याच आत्मीयतेने समरस झालों तर ते आनंदरावांच्यापेक्षा आपल्याला जास्त महत्त्व देतील. आपलं ऐकतील; त्यांचं नाही. खरं आहे की नाही ? तुम्हीच सांगा. (आनंद अनिरुद्धाला हाक मारतो.) कोण आहे ?

आनंद : (प्रवेश करून) कुंदाताई, अनिरुद्ध आला आहे न इथे ?

कुंदा : येऊन उशीर नाही तर पुरवलीत त्यांची पाठ ! असेल आजहि एखादं व्याख्यान !

आनंद : हो. व्याख्यान आहे अन् तेंहि महत्त्वाचं. अनिरुद्धानं आता पुढाकार घ्यायला हवा; हीच वेळ आहे. इतकी चांगली संधि पुन: यायची नाही. (आनंदाच्या येण्याची अनिरुद्धाला चाहूल लागूं नये म्हणून काकांच्या खोलीचं दार कुंदा लोटून घेते.)

शरद् : अनिरुद्धावाचून राजकारण कांही ओस पडत नाही. पुढारीपण घ्यायला पुष्कळ थोर लोक पडले आहेत.

आनंद : तूं आपल्या ऑफिसांतल्या भानगडीबद्दल मत देत जा. राजकारणाशीं तुझा कांही संबंध नाही अन् तुला तें कांही समजायचं नाही.

कुंदा : माफ करा अन् अनिरुद्धांना आता आणखी भानगडींत पाडूं नका. आहेत तेवढे व्याप पुरे झाले. कामाच्या ओझ्याखाली तुम्ही त्यांचा प्राण घेतां आहांत. तुम्ही कामाचा जुलूम करून अन्

त्यांचं मन भडकवून देऊन ही दशा केली आहे त्यांची. पण एवढयानं नाही झाली तुमची तृप्ति. आनंदराव, आजपर्यंत मी तुमचं पुष्कळ ऐकून घेतलं. तुम्हाला राजकीय भानगडींत करायची असेल तितकी घालमेल करा. सभा करा, संप लढवा, अन् वाटलीं तर डोकीं फोडा. पण अनिरुद्धांना त्यांत ओढूं नका. तें वर्तमानपत्र सुद्धा सांभाळा तुम्ही. अनिरुद्ध इथे राहतील. इथे त्यांच्या प्रकृतीची योग्य ती काळजी घेतली जाईल. आणि सवडीनुसार त्यांच्या ग्रंथाचंहि काम होईल.

आनंद : कुंदाताई मी तुम्हाला हें बजावून सांगतों की तुम्ही अनिरुद्धाला अद्याप ओळखलेलं नाही. माझ्याबद्दल तुमचं मत चांगलं दिसत नाही. शरद्चं तें कधीच चांगलं नव्हतं. आणि त्यानं तुमचंहि मत कलुषित केलं असेल तर नवल नाही. पण तुमचं मत माझ्याबद्दल चांगलं असलं काय अन् नसलं काय मला त्याचं कांही नाही. पण अनिरुद्धाबद्दल मात्र तुम्ही भलता समज ठेऊं नका. तुम्हाला अनिरुद्धाची खालावलेली शरीरप्रकृति दिसते. पण बुजत आलेले अंतःकरणावरचे व्रण दिसले नसतील. तुम्हाला वाटतं की इथे अनिरुद्ध तुमच्या सहवासांत मौजेनं काळ कंठील आणि हां हां म्हणतां त्याची प्रकृति सुधारेल. त्याची प्रकृति सुधारली तर आनंदच आहे. प्रकृति सुधारण्याच्या कामीं म्हणाल ती सेवा मी तत्परतेनं करीन. पण काल कांही गोष्टी मी शरद्ला बजावून सांगितल्या, त्या गोष्टींचं त्याला कांहीच महत्त्व वाटलेलं दिसत नाही. पण तुम्हाला मी बजावून सांगतों की जोपर्यंत अनिरुद्धाच्या कोणत्याहि जुन्या स्मृति जागृत झाल्या नाहीत तोंपर्यंत त्याच्यांत जोम असलेला दिसेल—तोंपर्यंतच तो प्रवृत्तिपर अन् उत्साही राहील. सहज म्हणून वादाला प्रेमाचा गुळगुळीत विषय घेतलात तर आधी तो भडकेल आणि नंतर—कोणास माहीत! थोर अन् अद्वितीय पुरुष होण्याची त्याची लायकी आहे. पण अंतःकरणाचे बांध फुटले तर सगळे मोठे गुण वाहून जातात.

कुंदा : अनिरुद्धांची काळजी फक्त तुम्हाला एकट्यालाच आहे असं समजूं नका. आम्हीहि कोणी तरी आहोंत. त्यांच्याबरोबर तुमचंहि प्रस्थ वाढतं आहे म्हणून तुमचा एवढा आटापिटा.

आनंद : वाटलं तर याच्याहून वाईट आरोप करा माझ्यावर. मला त्याचं कांही नाही. पण तुम्ही निस्वार्थी असाल तरच ठीक आहे. नाही तर भयंकर निराशा झाल्याचीं दुःखं कदाचित् तुम्हाला भोगावीं लागतील. देव करो अन् तसं न होवो. तुम्ही अनिरुद्धाशीं लग्न करून सुखी व्हाल असं समजूं नका.

कुंदा : [ चिडून ] काय, काय बडबडतां आहां हें ?

आनंद : कुंदाताई, माझं काळीज दगडाचं आहे असं समजूं नका. मी मुद्दामहून तुम्हाला दुःख देण्याकरता हें बोलतों आहे असंहि समजूं नका. पण अनिरुद्ध आपल्या अंत:करणाची अवस्था जाणून आहे. त्याचं अंत:करण कोमल आहे आणि तो तुमच्याशीं निर्दयपणानं वागणार नाही. पण प्रथम तो तुमच्या सुखाचा—तुमच्या भवितव्याचा विचार करील. तुमचं मन मोडेल पण तें हितबुद्धीनं. अगदी निस्वार्थी बुद्धीनं तुम्ही अनिरुद्धाला ठेवून घेत असाल तर निदान तुमची फसगत तरी व्हायची नाही.

कुंदा : (संतापातिरेकाने) तुम्ही जा पाहूं इथून. जा एकदम. नसत्या गोष्टी बोलायला कुणी म्हटलं होतं तुम्हाला ?

आनंद : तुम्ही अनिरुद्धाला ठेऊन घेतलंय खरं. पण त्याला इथ कितपत सुख लागेल ह्याबद्दल शंकाच आहे. निदान एवढी विनंति करतों की अनिरुद्ध तुमच्या इच्छा सफल करायला तयार न झाला तर त्याला जपा. वाईट तऱ्हेनं वागवूं नका. मी त्याच्या समाचाराला येत राहीनच. पण जरा जपून वागायला सांगून ठेवतों. अनिरुद्धाला परत नेण्याकरता मला लवकरच यावं लागेल हें मी जाणून आहें.

कुंदा : तुम्ही एकदम चालते व्हा पाहूं. शरद्, तुम्ही यांना एकदम चालते व्हायला सांगा पाहूं. ( आई दारांत येते ) आई, यांना म्हणावं की एकदम चालते व्हा.

आई : काय झालं कुंदा ?

आनंद : कांही नाही झालं आई. आणखी कधी येईन मी अनिरुद्धाच्या समाचाराला. ( जातो. )

कुंदा : तुम्ही जा शरद्, आणि इथे येत जाऊं नका म्हणून सांगा त्यांना. ( शरद् जाऊं लागतो. )

आई : असं काय करतेस कुंदा ! ( शरद् जातो. )

कुंदा : ( रडकुंडीला येऊन ) अतिशय दुष्ट आहेत ग ते. महा नीच आहेत. आई—( उद्वेगाने आईला बिलगते. )

# ३

[ काकासाहेबांच्या बंगल्याचा तोच दिवाणखाना. सजावटींत फारसा फरक नाही.

दिवाणखान्यांत काकासाहेब चिरूट ओढत येरझारा घालत आहेत. त्यांची मुद्रा ते अतिशय विचारमग्न झाले असल्याचें दर्शवीत आहे. बेबीला तिच्या मास्तरणीने शाळेंतल्या संमेलना-करता नाचगाणें शिकवलेलं आहे; व ती गाणें गुणगुणत नाचाची तालीम करते आहे. 'काका हें बरोबर आहे का?' 'काका, हें चांगलं दिसतं का?' असे प्रश्न ती विचारते. काका फक्त 'हूं, हां' असलीं उत्तरें देतात. ]

बेबी : (जरा चिडून) असं हो काय करतां काका! मी तुम्हाला नाचून अन् गाऊन दाखवतें आहे आणि तुम्ही एक शब्दहि बोलत नाही. बाईना की नाही माझं काम खूप खूप आवडतं. सगळयांत चांगलं काम त्या मलाच देतात.

काका : आहेच तशी तूं. बेबी, जरा जाऊन पाहून तर ये अनिरुद्ध निजून उठले कां? (बेबी जाऊं लागते.) हें पहा बेबी, उठले नसतील तर झोपमोड नको करूंस त्यांची. (जाते.)

[ काकासाहेब चिरूट ओढत त्याच विचारमग्न स्थितींत येरझारा घालत आहेत. आई येते. काका नुसते तिच्याकडे पाहतात व पुनः येरझारा घालूं लागतात. आई चहाचं टेबल, कोच व खुर्च्या यांच्यामधे आणून ठेवते व त्यावर टेबलक्लॉथ टाकते. हें झाल्यावर क्षणभर थांबते. काकासाहेब कांहीच बोलत नाहीत. ]

आई : कां, काय झालंय?

काका : कुठे काय? कांही तर नाही. (पुन: फिरतात.)

आई : (कुंदा आणि अनिरुद्ध तर आसपास नाहीत याची खात्री करून घेण्याकरिता आजूबाजूला पाहतात व नंतर) कुंदाबद्दलच्या विचारांनी माझं मन अस्वस्थ करून टाकलंय. रात्रभर तिच्याबद्दलच विचार मनांत घोळत होते.

काका : आणि मी अनिरुद्धांच्याबद्दल विचार करत होतों. (बेबी येते.)

बेबी : हो काका. अनिरुद्ध केव्हाचेच निजून उठले आहेत. त्यांनी आपलीं खूप मोठीं मोठीं पुस्तकं पसरविलीं आहेत. काका, ते इकडे वाचतात अन् इकडे लिहितात. आम्ही नाही करत असा अभ्यास.

काका : बेबी, ताई नाही उठली का अजून ?

बेबी : मला नाही माहित.

काका : जा बरं, जाऊन पाहून ये बरं. (बेबी वर जाते.)

आई : (जिन्यावर नजर ठेऊन) काय वाटतं तुम्हांला अनिरुद्धांच्याबद्दल ?

काका : लाखांत एक आहे. असलीं माणसं फार दुर्मिळ असतात. आपला जीव दडपून जावा एवढे प्रचंड श्रम करताहेत. पण इकडे वातीप्रमाणे जीवन झपाट्यानं जळतं आहे. आठ दिवस उपचार केले मी. आश्चर्य वाटतं मला की त्यांच्या प्रकृतींत म्हणण्यालायक फरक नाही. त्यांना विचारलं तर म्हणतात की हो, हो, आता पुष्कळ बरं वाटतंय. कामापायीं व्याधींची शुद्ध नाही गृहस्थाला.

आई : दुसऱ्या डॉक्टरांना बोलावून त्यांचा सल्ला घ्यावा. रोगाचं योग्य निदान व्हायला हवं.

काका : तसंच मलाहि वाटतं. डोळ्यावरहि उपचार करावे लागतील त्यांच्या. माझ्या ओळखीच्या दोन तीन डॉक्टरांना उद्या परीक्षेकरता बोलावूनच घेतों.

[कुंदा व बेबी जिना उतरतात. कुंदा नुकतीच झोपेंतून उठून आलेली आहे. केशभूषा व वेषभूषा फारशी व्यवस्थित नाही. ती सुस्त व त्रस्त दिसते.]

बेबी : (कुंदाला चिडवीत गाते.)

माझ्या दारावरनं
कोण गेलं झपाट्याचं?
लाजु नको ताई,
ते ग वारं सोसाट्याचं!

आई : आज किती उशीर केलास उठायला कुंदा!

कुंदा : तुझं मेलं सदाकदा असंच! कशाला पाठवलंस बेबीला उठवायला? अन् निजलें असतें तर काय असं बिघडणार होतं?

[तोंड धुण्याकरता आंत जाते. पाठोपाठ बेबीहि जाते.]

आई : आताशा ही जरा चिडचिड करूं लागली आहे.

काका : साहजिक आहे. तिचंहि मन अस्वस्थ आहे. तिचा जीव अनिरुद्धांच्याकरता तिळतिळ तुटतोय्. आपल्यापासून लपवायला पाहते आहे ती.

आई : अनिरुद्धांच्या मनाचा ठाव घेतला आपण ?

काका : आपल्या बुद्धिमत्तेनं दिपवून टाकतो गृहस्थ. पण बाकीच्या बाबतींत अगदी अजाण बालकासारखं वागणं आहे. मन अगदी कोवळं आहे. कधी कुणाच्या भावना मुद्दामहून दुखावणार नाही आणि यदाकदाचित् दुखावल्या गेल्या तर तेव्हाच वाईट वाटतं त्यांना. आणि माफीहि मागतात. मी त्याचं कुंदाशीं वागणं पाहतोंय. अतिशय जपतात तिच्या भावनांना. पुष्कळ बाबतींत तिचं मन मोडतात खरे. पण त्याचं त्यांनाच वाईट वाटतं. काम बाजूला ठेवायला म्हटलं तर मात्र कोणाचं ऐकत नाहीत.

[ कुंदा परत येते. ]

कुंदा : अनिरुद्ध गेले ?

काका : अनिरुद्ध ? कुठे ?

कुंदा : अगदी पहाटे आनंदराव आले होते नं ? इथेच तर तुमच्याशीं बोलले अन् अनिरुद्धांना घेऊन जातों म्हणाले.

काका : स्वप्न पडलं तुला. आनंदराव आले नव्हते.

कुंदा : (आश्चर्याने) आलेच नव्हते ? इथे जिन्यांत उभं राहून पाहिलं मी.

आई : तुला कांहीतरी भास झाला कुंदा.

कुंदा : आनंदरावांचं तोंड पाहूं नये असं वाटतं ग. रोज रोज येतात ते इथे. हजार भानगडी अनिरुद्धांना सांगतात आणि हें करूं

की तें करूं असं होऊन जातं अनिरुद्धांना. काका, तुम्ही म्हणा आनंदरावांना की येत जाऊं नका म्हणून.

आई : वेडी तर नाही झालीस तूं कुंदा? आनंदरावांचं अन् अनिरुद्धांचं एकमेकावर किती प्रेम आहे. आनंदरावांना येऊं नका म्हणून कसं म्हणतां येईल ?

कुंदा : आई, महा नीच मनुष्य आहे ग तो. त्याची सावली सुद्धा अनिरुद्धांवर पडायला नको.

आई : काय केलं असं त्यांनी ?

कुंदा : काय केलं ? शरद्ना विचार त्यांचं चारित्र्य. शरद्ना विचार त्यांचं पूर्वायुष्य. आणि पहा एकदा की किती हलकट अन् नीच मनुष्य आहे तो. सगळं सगळं शरद्नी मला सांगितलं.

काका : काय सांगितलं शरद्नी ?

कुंदा : एकदोन नाही, हजार भानगडी सांगितल्या. अगदी बेछुटपणें वागण्याचा जीवनक्रम होता त्यांचा. अगदी किळसवाणं चारित्र्य होतं. बिनदिक्कत वाटेल तें करण्याचा स्वभाव आहे त्यांचा. अगदी दगडाचं अंतःकरण आहे त्यांचं. मनुष्य नाही सैतान आहेत ते. अनिरुद्धांचा आनंदरावावर पूर्ण विश्वास! आनंदराव इतके हलकट असतील हें पटतच नाही त्यांना.

काका : आनंदरावांच्याबद्दल तूं आपलं असं मत बनवून घेतलंस, पण खरं काय आहे हें जाणून घेण्याचा प्रयत्न केला होतास ?

कुंदा : शरद् काय खोटं सांगतील ?

काका : पण शरद्च्या सांगण्यावरून आपलं मत बनवून टाकण्याआधी आनंदरावांशीं बोलून त्यांनाहि समजून घ्यायला हवं होतं.

कुंदा : कांही जरूर नाही एवढी. मला त्यांचं तोंडहि पहावसं वाटत नाही.

काका : बरं कुंदा, अनिरुद्धांना चहाला इकडेच बोलाव. (चहा आणायला आई आंत जाते) आणि कुंदा, तिथे जाऊन त्याच्याशीं वादविवाद करत नको बसूं. नाही तर ते तत्त्वज्ञ आणि तूं तत्त्वज्ञानाची विद्यार्थिनी. वाद रंगांत आला की विसरतां झालं शुद्ध. आणि वाद करायचाच झाला तर त्यांना इथे घेऊन ये. मग चहा घेतां घेतां करा वाटेल तितका वाद. जमल्यास आम्हीहि भाग घेऊं.

कुंदा : काका ते नेहमी नेहमी तत्त्वज्ञानच बोलतात हो. दुसरं कांही बोलतच नाहीत.

काका : हें घ्या, तत्त्वज्ञान तुझा आवडता विषय आहे म्हणून बोलतात तुझ्याशीं; आपल्या विठूशीं नाही बोलत कुठे तत्त्वज्ञान.

कुंदा : पण नेहमी नेहमी तेंच बोलणं म्हणजे हो काय! मला नाही बरं वाटत तें.

काका : मग काय बोलावं त्यांनी तुझ्याशीं ? (स्मित करीत) सांग नं, त्यांनी काय बोलावं असं वाटतं तुला ?

कुंदा : कुणास ठाऊक ! मला नाही सांगतां येत.

काका : मी सांगतों काय तें. तूं दिवसभरांत दहादा पोषाख बदलतेस तिकडे त्यांचं लक्ष जावं आणि त्यांनी तुला म्हणावं की किती सुंदर दिसतेस तूं कुंदा ! त्यांनी तुला म्हणावं की तूं गोल पातळ नेसलीस, पाठीवर तो लांब शेपटा सोडलास, आणि नाचत बागडत हिंडूं लागलीस की सारखं पहात बसावंसं वाटतं. तुझ्या कानांतल्या त्या नाजुक डुलांची त्यांनी स्तुति करावी. कां, असंच वाटतं नं तुला ?

कुंदा : (लटक्या रोषाने) तुम्ही सदा कदा थट्टाच करतां माझी. (आई चहाचें साहित्य घेऊन येते.) बरं, जातें अं अनिरुद्धांना बोल-

वायला. (दरवाजापर्यंत जाते. आनंद आलेला तिला दिसतो. त्याला पाहिल्याबरोबर तेथेच थांबते आणि अनिरुद्धाच्या खोलींत जाण्याऐवजी त्याच्या खोलीचं दार घट्ट लावून घेते. आनदाला उद्देशून रूक्ष स्वरांत) या! (तो अनिरुद्धाच्या खोलीच्या दाराकडे जाऊं लागतो. कुंदा दिवाणखान्यांतल्या खुर्चीकडे बोट दाखवते) इकडे—(आनंद खुर्चीजवळ जातो) बसा. (आनंद बसतो.)

आनंद : (स्मित करीत) संपले हुकूम ?

काका : आनंदराव, कुंदा तुमच्यावर रागावली आहे.

आनंद : (अतिशय सभ्यपणें) हो काकासाहेब, मला तें माहित आहे. मी त्यांचं मन दुखवलं आहे हेंहि खरं. पण ज्या गोष्टी कुंदाताईना उद्या कळणार त्या जर मी आजच आणि योग्य वेळीं सांगितल्या तर मी त्यांत असा कोणता अपराध केला ?

कुंदा : आनंदराव, तुम्ही नसत्या गोष्टी काढूं नका. तुमचं अनिरुद्धाशीं काय काम आहे तें सांगा आणि—

आनंद : (हसत) आणि आल्या वाटेने चालायला लागा.

कुंदा : मी तसं म्हणालें नाही.

आनंद : आणि म्हणालां असतां तरी मी तें मनाला लावून घेतलं नसतं.

काका : जाऊं द्या आनंदराव. माझ्याशीं बोला तुम्ही.

आनंद : आता कशी आहे अनिरुद्धाची प्रकृति ?

काका : म्हणण्यालायक कांहीच सुधारणा नाही. उद्या मी दोन तीन नामांकित डॉक्टरांना तपासणीकरता बोलावणार आहे. आणखी महिनाभर तरी त्यांना सगळ्या कामांतून निवृत्त झालं पाहिजे. (तें ऐकून

आनंद विचारांत पडतो.) कां कांही मोठं महत्त्वाचं काम घेऊन आलां होतां की काय? राजकारणांत पडण्यालायक तर त्यांची स्थिति नाही.

आनंद : राजकारणांत पडण्यालायक त्याची अवस्था नाही हें मी जाणून आहें. आणि राजकारण लढवण्याकरतां क्षणोक्षणीं त्याची सारखी जरूरी भासत असली तरी त्याबद्दल मी आग्रह करीत नाही. प्रकृति एकदा ठीक होऊं दे. मग राजकारणाचं पुढे पाहूं. त्याला दगदग म्हणून पडूं द्यायची नाही हें मी ठरवून टाकलं होतं. वर्तमान-पत्र तर मीच संभाळतों आहे आठ दहा दिवसांपासून. अनिरुद्धानं पूर्ण विश्रांति घ्यायला पाहिजे व प्रकृति पूर्णपणें सुधारायला हवी हीच माझीहि अगदी पहिली इच्छा आहे. तुमच्या इथे त्याचं सगळं अगदी व्यवस्थित होतं आहे—कशांत उणं पडूं दिलं जात नाही—

कुंदा : फारशी प्रस्तावना न करतां काय बोलायचं आहे तेंच सरळ अन् स्पष्ट बोला.

आनंद : काकासाहेब, मी, मला काही सांगायचं आहे म्हणून आलेलों नाही. मला तुम्हांलाच योग्य तो सल्ला विचारायचा आहे. आजपर्यंत त्याच्या थोर कार्याकरता मी त्याला इतर क्षुद्र भानगडींच्या त्रासांतून वाचवत होतों. आणि प्रकृतिपुढे इतर सर्वच गोष्टी क्षुद्र असल्यामुळे तुम्ही सर्व इतर भानगडीपासून त्याला वाचवितां आहां. पण एक फारच विचित्र परिस्थिति उत्पन्न झाली आहे. अनिरुद्धाच्या वडिलांना—तात्यांना—आवरणं अतिशय कठिण होऊन बसलं आहे.

काका : तुम्ही त्यांची सगळी व्यवस्था केली आहे ना?

आनंद : घर भाडेकऱ्याकडून रिकामं करवून घेतलं होतं. तिथे सगळं सामान जमवून दिलं आणि एक स्वयंपाकी व एक गडी त्यांच्या सेवेला ठेऊन दिला. ते आले तेव्हा अनिरुद्ध त्यांना भेटून गेला होता. तोंपर्यंत सगळं ठीक होतं. पण आता त्यांचा पार भडका उडून गेला

आहे. परवा दिवसभरांत चारदा जावं लागलं मला त्यांच्याकडे. आणि काल तर जवळ जवळ सगळाच वेळ त्यांच्याजवळ काढावा लागला.

कुंदा : घेऊन जा एकदाचं अनिरुद्धांना आणि होऊं द्या तुमच्या मनाप्रमाणे.

आई : कुंदा, असा काय आततायीपणा करायचा ?

कुंदा : (रडकुंडीला येऊन) पहा नं ग आई, रोज रोज एक एक निमित्त घेऊन येताहेत त्यांना न्यायला.

आनंद : आज अनिरुद्धाला नेण्याकरता निमित्त घेऊन नाही आलों मी. कुंदाताई, आता काय करायचं याबद्दल काका आणि आई यांचा सल्ला घ्यायला आलों आहे मी.

काका : काय झालंय तात्यांना ?

आनंद : आधीपासूनच म्हातारा आहे दीर्घद्वेषी अन् भयंकर संतापी. सगळं जग वैरी वाटतं त्यांना. अनिरुद्धावर त्यांचं भयंकर प्रेम आहे. भयंकर म्हणजे अक्षरशः भयंकर. त्यांना वाटतं की जो तो अनिरुद्धाला फसवायला पाहतो आहे, बुडवायला पाहतो आहे आणि म्हणून एकेकाला अगदी खाऊं की गिळूं असं करताहेत ते. प्रवासाला जाण्यापूर्वी सगळ्या इस्टेटीचा कारभार ते अनिरुद्धाच्या स्वाधीन करून गेले होते. अनिरुद्धाचं बरंच दुर्लक्ष झालं आणि भावांनी मुखत्यारीचा फायदा घेऊन कोर्टाच्या कज्ज्यांत अडकलेली सर्व इस्टेट आपली करून घेतली. तात्यांनी तें सगळं पाहिलं आणि त्यांचं माथं अगदी भडकून गेलं आहे. संतापापायीं तर त्याची डोकं फिरल्याप्रमाणे अवस्था झाली आहे.

काका : मग काय केलं तुम्ही ?

आनंद : तें काम माझ्या आवाक्याबाहेरचं आहे. सांगा

काकासाहेब, काय करायचं आता? हें सांगू का अनिरुद्धाला? हे कळलं की मग तो क्षणभरहि इथे थांबणार नाही.

[ सगळे जण कांही वेळ विचारमग्न होऊन बसतात. काकासाहेब चिरूट शिलगावतात व मग जरा वेळ विचार करून—]

काका : तात्यांना सांभाळण्याची जबाबदारी अनिरुद्धांवर पडायला नको. परिस्थिति बिकट आहे खरी. (आणखी जरा वेळ विचार करतात.) अनिरुद्ध येऊन तात्यांचा समाचार घेऊन जातील. मीहि येईन त्यांच्याबरोबर.

आनंद : काकासाहेब, मला खरी चिंता तात्यांची नाही. अनिरुद्धाची आहे.

काका : अनिरुद्धांची ?

आनंद : हो. या प्रकरणीं त्याला चांगलाच धोका आहे.

काका : म्हणजे ? मी नाही समजलों तुमचं म्हणणं.

आनंद : मानसिक उद्विग्नतेचा जर एक जबर धक्का बसला आणि त्यापायीं ह्या सर्व कामांतून त्याचं चित्त उडून गेलं तर थोडयाच अवधींत अनिरुद्धाची भयंकर अवस्था झालेली तुम्हाला दिसून येईल. अनिरुद्धाचं मन अतिशय कोवळं अन् हळवं आहे. कांही लोकांचीं अंतःकरणं अशीं असतात की त्यावर झालेल्या जखमा बुजत नाहीत. अनिरुद्धाचं अगदी तसं आहे. इकडे राजकारणांत एखाद्या शूर वीराप्रमाणे तो पुढे सरसावतो आहे. पण अंतःकरणाच्या न बुजलेल्या जखमा त्यानं नुसत्या दाबून धरल्या आहेत. त्या जखमा एकदा का मोकळ्या झाल्या की तत्काळ तें थोर व्यक्तिमत्त्व तुम्हाला एकदम खचलेलं दिसेल.

आई : कशाच्या जखमा झाल्या आहेत त्यांच्या अंतःकरणाला? तुम्ही स्वतः कांही भलतीच कल्पना तर करून घेतलेली नाही?

आनंद : काकासाहेब, अनिरुद्धाने कामाचे एवढे प्रचंड व्याप का उभारले आणि त्यांत स्वतःला कां पुरून घेतलं, माहित आहे तुम्हाला?

कुंदा : न्यूनगंड असह्य होतो, म्हणून अहंकाराचं शमन होई-पर्यंत जीवाला स्वस्थता लाभत नाही. त्यामुळे मोठेपणा मिळण्याकरता अविरत श्रम केल्यावाचून राहवतच नाही. स्वत: अनिरुद्धांनीच आप-णाला श्रम केल्यावाचून कां रहावत नाही याचं असं स्पष्टीकरण केलं होतं.

आनंद : हें झालं ब्रह्मज्ञान! मला कुठे कळतं आहे तें. मी सांगतों तुम्हाला माझं स्पष्टीकरण. अंतःकरणाच्या जखमा असह्य झाल्या की कांही ना कांही करून स्वतःचा विसर पडण्याची अतिशय तीव्र जरूर भासते. एवढं खरं की आवरायला अन् धीर द्यायला मायेचीं माणसं जवळ नसलीं की असह्य मानसिक यातनांचा विसर पडण्या-साठी मनुष्य एखाद्या भयंकर व्यसनाच्या आहारीं गेल्यावाचून राहत नाही. दारूच्या आहारीं जाणं आणि झिंगत पडून दुःख विसरणं ही झाली सामान्य रीत. अनिरुद्धानंहि स्वतःला एक भयंकर व्यसन लावून घेतलं; पण दुसऱ्याचं कल्याण करील असं. स्वतःच्या मानसिक यातनांचा विसर पाडण्यासाठी त्यानं कामाचे एवढे प्रचंड तट उभारले होते. ते तट कोसळून पडण्याचा—ते अंतःकरणाचे बांध फुटण्याचा—संभव आहे काकासाहेब.

काका : आनंदराव, तुमच्यासारखा मनुष्यहि असा भावनेच्या आहारीं जाऊन नसत्या शंकाकुशंका काढू लागला!

आनंद : त्या शंकाकुशंका सपशेल फोल ठरोत हीच माझी इच्छा आहे. तात्यांचं वर्तन त्याच्या मनांत एक भयंकर उत्पात घडवून आणल्यावाचून रहाणार नाही असं मला वाटतं आहे. मी एक अडाणी मनुष्य आहे. मला खूप वाटतंय् पण सांगतांच येत नाही.

[ 'काकासाहेब काकासाहेब' म्हणून अनिरुद्ध हाक मारतो व दार उघडतो. ]

अनिरुद्ध : चहाची वाट पाहून अगदी दमलों मी. थांबवावंच लागलं मला काम. खोलींतच चहा करून घेणार होतों. पण दूधच संपलं होतं. (टेबलावर चहाचं साहित्य ठेवलेलं असतं, आई एकदम किटलीला हात लावून पाहते, सगळं निवून गेलेलं असतं. अनिरुद्धाचं तिकडे लक्ष जातं.) अरे वा, चहा तर तयार होऊनच आलेला दिसतो आहे. (आई चहाची किटली ऊन करून आणण्यासाठी आंत घेऊन जाते.) कां, परत घेउन चाललात ?

आई : बराच वेळ ठेवला राहिला. निवून गेलाय तो. थांबा, गरम करून आणतें.

अनिरुद्ध : म्हणजे मला वाटतं मला यायला फार उशीर लागला. माझ्या लक्षांतच नाही राहिलं. मला बोलावलं होतं ?

[ सगळेजण गंभीर असतात. उत्तर कोणीच देत नाही. थोडया वेळाने—]

काका : बसा नं अनिरुद्ध. (अनिरुद्ध बसतो.) आता कशी आहे तुमची प्रकृति ?

अनिरुद्ध : काकासाहेब, प्रथम तुम्ही माझ्या झोपेवर कांही इलाज करा.

काका : झोपेच्या गोळ्या तर देतों रोज रात्रीं. त्यांनीहि नाही येत का नीट झोप ? इंजेक्शनं देऊं नाही तर.

अनिरुद्ध : झोप येते काकासाहेब, पण नीट नाही येत. मधून मधून सारखा दचकतों मी. एकाएकीं जीव घाबरूं लागतो आणि सारखी खूप भयंकर स्वप्नं पडत असतात. जागा झाल्यावर तीं स्वप्नं आठव-

ण्याचा प्रयत्न केला तर कांहीच नीटसं आठवत नाही. असा भास होतो की पाठीमागे कुणी तरी एक खूप भयंकर माणूस उभा आहे. भीत भीत मी पाठीमागे नजर वळवूं लागतों तों एक अतिशय राकट हात मला दिसतो. आणि ती व्यक्ति पूर्णपणें दिसते न दिसते तोंच त्या राकट हातांतला खंजिर माझ्या पाठींत खुपसला जातो. भयंकर कळ निघते. तर दुसऱ्या वेळीं एक यक्षिणी समोर उभी राहते. एखाद्या जादुगाराप्रमाणे असा हात फिरवून ती माझ्यावर मोहनिद्रा घालते. ती एकएक पाऊल मागे सरकत जाते अन् मी एखाद्या भ्रमिष्टाप्रमाणे तिच्याकडे चालत जातों. तिच्या पायाखालची जमीन एकाएकी सरते आणि जमिनीवर चालावं त्याप्रमाणे ती हवेवर चालत एक एक पाऊल मागे जाते. मी जमीन सरते तेथपर्यंत जातों; पण माघार घेत नाही. पायाखालची जमीन सरल्याबरोबर मी एकदम खालीं कोसळतों. खाली खाली जात राहतों पण कांही केल्या पायाला जमीनच लागत नाही. इतका जीव घाबरून जातो की काय सांगूं ! काकासाहेब, काय कारण असेल याचं ? मानसिक व्याधि आहे कां ही ?

काका : ऑर्गॅनिक डिस्टरबन्सेस, दुसरं काय ! (आई चहा घेऊन येते). पाहतों मी त्याचं आणि करतों त्याच्यावर उपचार. तुम्ही मुळीच काळजी करूं नका.

अनिरुद्ध : आनंद, एक काम कर तूं. एक खूप स्प्रिंग असलेली मऊमऊ अन् आरामशीर खुर्ची मिळाली तर पहा. तिच्यावर बसून लिहितां वाचतां आलं पाहिजे. मान अन् पाठीचा कणा अतिशय ठणकूं लागतो.

काका : मग विनाकारण एवढे श्रम कशाला करतां ?

अनिरुद्ध : हं, आता श्रम बंद करावेत असं मला वाटूं लागतं खरं. पण मला वाटतं, मला नाही जमायचं तें.

काका : अरे वा, न जमायला काय झालं ?

अनिरुद्ध : मग वेळ कसा काढणार मी ! रिकामा राहिलों तर नाही नाही ते विचार थैमान घालूं लागतील आणि कदाचित्—

काका : आम्ही आहोंत सगळेजण. इथे येऊन बसत जा आमच्यांत.

अनिरुद्ध : मोठी विचित्र आहे माझी अवस्था. तुम्ही सगळेजण बोलत बसलां की विचारांच्या तंद्रींत दुसरीकडेच माझं मन भटकतं आणि मग मोठी हास्यास्पद स्थिति होऊन जाते.

काका : पण तुम्ही एकेक सिद्धान्त समजावून सांगूं लागलांत की किती प्रफुल्ल दिसतो तुमचा चेहरा. अगदी भान हरपल्याप्रमाणे बोलतां तुम्ही. त्या तऱ्हेनं वेळ काढूं शकाल.

अनिरुद्ध : पण असं कसं होऊं शकेल काकासाहेब !

काका : कां ?

अनिरुद्ध : मला नाही येत त्या गोष्टींचा कधी कंटाळा. अहोरात्र डोक्यांत तत्त्वज्ञान घोळत राहतं तरी मला नाही येत त्याचा वीट. पण माझं बोलणं ऐन ओघांत आल्याबरोबर मला भीति वाटते की ऐकणारे आता कंटाळतील. माझ्या बोलण्यामुळे ऐकणाऱ्याच्या चेहऱ्यावरचा उल्हास मावळलेला मला दिसूं लागतो. तोही एक दुसऱ्यावर जुलूमच आहे. काकासाहेब, तुम्हाला त्रास देण्याला सुद्धा कांही मर्यादा पाहिजे. तुम्ही माझ्यासारख्या तिसऱ्या तिऱ्हाईतासाठी इतका त्रास सहन करतां—( आई चहाचा कप पुढे करते. अनिरुद्ध घेतो. तेवढयांत आपण काय बोलत होतों तें विसरतो. ) अं, काय बरं म्हणत होतों मी ?

[ बेबी परत येते. ]

काका : आता मी तुमच्याकरता दिवसभराचा कार्यक्रम आखून ठेवत जाईन. घरांतला प्रत्येकजण तुमच्या मनोरंजनाकरता आपली

शिकस्त करील. मला निरनिराळ्या रोग्यांच्या मन:स्थितींच्या हकीगती लिहिण्याचा छंद असे. मी त्या तुम्हाला वाचून दाखवत जाईन. आणि नंतर आपण त्यांचं मनोविश्लेषण करून मनोव्यापारांचीं मूलतत्त्वं हुडकून काढायचीं. तूं ग काय करशील कुंदा? अनिरुद्ध, तिला भावगीतं चांगलीं म्हणतां येतात. तीं म्हणायचं काम तिच्याकडे लागलं. आणि आमच्या सुषमाताई फार सुरेख नृत्य करतात, त्यांना गातां येतं, फिडल् वाजवतां येतं आणि गोष्टी सांगतां येतात.

बेबी : पण काका, अनिरुद्धांनी मला गाणं म्हणायला एकदाहि नाही म्हटलं.

अनिरुद्ध : सुषमाताईंना नाचणं अन् गाणं येतं हें मला माहितच नव्हतं.

बेबी : तुम्ही मला विचारलं होतं का कधी?

अनिरुद्ध : पण तुम्ही आपण होऊन कां नाही सांगितलं? तुम्ही आपण होऊन केव्हा सांगतां याचीच वाट पाहत बसलों होतों मी. बरं आता म्हणा.

बेबी : आधी तुम्ही म्हणा. ( सर्वजण हसतात. ) बरं मी नाचतें, गाणं तुम्ही म्हणा. आमच्या बाई असंच करतात नं! ( पुन: सर्वांना हसूं येतं. )

आनंद : बरं मी जातों अनिरुद्ध.

अनिरुद्ध : कां चाललास? मला कांहीच सांगितलं नाहीस तूं?

आनंद : मी सगळं सांभाळून घेतों आहे. तूं नको फिकीर करूंस. पूर्णपणे विश्रांति घे. ( जाऊं लागतो. )

अनिरुद्ध : तात्यांच्याकडे गेला होतास नं? ठीक आहे न सगळं?

आनंद : राम अन् विजू यांच्यावर इतके चिडले आहेत की संतापापायीं अगदी डोकं फिरल्यासारखं झालं आहे.

अनिरुद्ध : ( अर्धवट स्वगत बोलल्याप्रमाणें ) अशी स्थिति आहे तात्यांची ? ( आनंद निघून जातो. )

कुंदा : काल आपलं कुठवर आलं होतं, आठवतं आहे का अनिरुद्ध ?

अनिरुद्ध : काल ? हो. हॉब्स्, फ्रॉईड आणि ॲडलर यांच्या सिद्धान्तांचं आपण पृथक्करण केलं आणि नंतर त्यांतला ग्राह्यांश वेचून काढला. ( आई चहाचं साहित्य घेऊन आंत जाते. पाठोपाठ बेबीहि जाते. ) याचप्रमाणे चिकित्सा करून इतर तत्त्ववेत्त्यांच्या सिद्धान्तांतून ग्राह्यांश काढून नंतर मग आपलं जीवनविषयक तत्त्वज्ञान मांडायचं.

काका : एक साधी जीवनविषयक गोष्ट तुम्हाला विचारतों. जीवन हा शब्द उच्चारला म्हणजे कशाची कल्पना आपल्या समोर उभी राहते ?

कुंदा : मी सांगूं अनिरुद्ध ? ( अनिरुद्ध होकारार्थी मान डोलवतो. ) जीवन म्हटलं म्हणजे आपल्या डोळ्यांसमोर आपल्या इच्छा आकांक्षा आणि त्यांच्या पूर्तिकरता चालवलेली धडपड उभी राहते, नाही ? ( बरोबर आहे ह्या अर्थी अनिरुद्ध मान डोलवतो. ) पुरुषाला कीर्ति हवी असते, स्त्रीला प्रेम हवं असतं—ह्याच आपल्या इच्छा आकांक्षा.

अनिरुद्ध : आपल्या इच्छा आकांक्षा म्हणजे स्वत्वाची, किंवा अहंकाराची म्हणा, अनुभूतिच.

कुंदा : मला नाही पटत तें. प्रेमाला सुद्धा अहंकाराची अनुभूति कसं म्हणतां येईल ? प्रेम म्हटलं म्हणजे ( काकासाहेब उठतात व हळू हळू जाणीव न होऊं देतां आपल्या खोलींत जातात. ) आपण स्वतःला विसरून जातों. आपलं सगळं लक्ष आपण ज्या व्यक्तीवर प्रेम करतों तिच्या सुखदुःखावर लागतं. आपल्याला रडूं येतं ते ज्या व्यक्तीवर

आपण प्रेम करतों त्याला यातना आहेत म्हणून—आणि प्रेमाकरिता आपण आपलं सर्वस्व सुद्धा अर्पण करायला सिद्ध होतों. (संकोचते) अनिरुद्ध हें नाही आलं तुमच्या लक्षांत ?

अनिरुद्ध : वास्तविक पाहतां, प्रेम म्हणजे स्वत्वाचं दुसऱ्या व्यक्तीवर केलेलं प्रक्षेपण. प्रेमी जीव एकमेकाशीं तादात्म्य पावतात असं आपण म्हणतों तें त्यामुळेच.

कुंदा : हें झालं नुसतं तत्त्वज्ञान! (लाजून खाली पाहते. धैर्य करून नजर वर आणते, अनिरुद्धांच्या डोळ्याशीं डोळे भिडतात आणि पुनः लाजून कुंदा खाली पाहते. अनिरुद्धाच्या लक्षांत त्याचा अर्थ येतो.)

अनिरुद्ध : तुझ्या म्हणण्याचा अर्थ आला माझ्या लक्षांत. (जरा वेळ थांबतो. कुंदा कांहीच बोलत नाही. खालीच पाहत राहते.) तूं म्हणतेस तें माझ्या लक्षांत आलं नाही असं का वाटतं तुला ? तर्कच नव्हेत तर भावहि कळतात मला.

कुंदा : मग असं असतांना तत्त्वज्ञानाच्या भाषेत कां बोलतां ? ज्या गोष्टी तुमच्या लक्षांत येतात त्यांच्याबद्दल तुम्हाला कांहीच नाही वाटत ?

अनिरुद्ध : कशाबद्दल बोलते आहेस तूं कुंदा !

कुंदा : तुम्हाला जें प्रत्यक्ष दिसतं आहे त्याबद्दल.

अनिरुद्ध : तुझं माझ्यावर किती असीम प्रेम आहे हें नाही का जाणत मी ? तुमचे उपकार जन्मोजन्मीं मला फेडतां येणार नाहीत. माझ्यासारख्या तिसऱ्या तिऱ्हाईताला—

कुंदा : तो शब्द नका वापरूं अनिरुद्ध. मी तुम्हाला—(लाजून खाली पाहत राहते.)

अनिरुद्ध : कुंदा मी तुझा अपराधी आहे. तुम्ही मला इतक्या प्रेमानं वागवलं, माझी इतकी शुश्रूषा केली. पण तें स्वीकारण्याचा मला मुळीच अधिकार नव्हता.

कुंदा : म्हणजे ?

अनिरुद्ध : चुकलं माझं कुंदा. मी जर तुझ्या प्रेमाचा स्वीकार करणार नव्हतों—

कुंदा : अनिरुद्ध !

अनिरुद्ध : माझं अंत:करण तुझ्याकरता तिळ तिळ तुटतं पण— (कुंदा डोळे मिटून घेते व ओंजळींत तोंड लपवते.) कुंदा असं काय करतेस ? बरं नाही कां तुला ? काकासाहेबांना बोलावूं कां ?

कुंदा : बोला तुम्ही अनिरुद्ध.

अनिरुद्ध : एकदा मला वाटलं होतं—खूप उत्कटतेनं वाटलं होतं की आपण लग्न करावं. पण तें सगळं माझं खरं जीवन सुरू होण्यापूर्वी. पुढे मी पुष्कळ विचार केला अन् ठरवलं की तो विचार कायमचा रद्द करायचा. पुढे मी वैयक्तिक अन् कौटुंबिक जीवनाच्या पलीकडे गेलों. जगाला जें आपण देऊं शकतों तें शक्य तितक्या लवकर देण्याचा मला ध्यास लागला. मृत्यूला मी वारंवार प्रार्थना केली आहे—

कुंदा : नका नं भलतं बोलूं—

अनिरुद्ध : मृत्यूला येण्याबद्दल मी प्रार्थना केली नाही कुंदा. मला जगाकरता जें करायचं आहे तें होईपर्यंत थांबण्याकरता. आजपर्यंत तो थांबला. आणखी दोन चार वर्षं थांबण्याकरता मी त्याला प्रार्थना करतों आहे. (जरा स्तब्ध राहतो.) माझं जीवन पहा कुंदा. माझ्या स्वतःच्या देहाची सुद्धा काळजी वहायला मी असमर्थ आहे. संसारी माणसानं स्वतःच्या देहाचीच काय पण कुटुंबांतल्या प्रत्येकाची, त्याच्या

आरोग्याची, उत्कर्षाची अहोरात्र काळजी वहावी लागते. माझ्यानं तें होईल कां ? शिवाय मी ती काळजी पत्करली की आज जें करूं शकतों आहे तें करूं शकणार आहे कां ? राजकारणांत असं बेपर्वाईनं लढतां येणार आहे कां ? कुंदा, मी एकदा त्या कौटुंबिक जीवनाच्या संकुचित मर्यादा ओलांडून पुढे गेलों आहें. मला मागे नको ओढूंस.

[ कुंदा समोरचें टेबल ओढून त्यांवर उद्वेगाने डोकें टेकते. बेबी दारांत येऊन तें पाहते, व ए आई, ए आई म्हणून हाक मारते. आई येते. ]

आई : (बेबीला काय झालं म्हणून विचारते, बेबी कुंदाकडे बोट दाखवते.) कुंदा, काय झालं तुला ? (कुंदाला रडायला येतें. काकाहि येतात. अनिरुद्ध ओशाळल्यासारखा होतो. काकाहि कुंदाला काय झालं म्हणून विचारतात.)

अनिरुद्ध : काकासाहेब, मला क्षमा करा. मी दुखवल्या तिच्या भावना.

काका : काय झालं अनिरुद्ध ? कुंदा तूं सांग पाहूं. (अनिरुद्ध कसाबसा खुर्चीला धरून तोल सांभाळतो. व हळू हळू सरकून खुर्चीवर बसतो. बसल्यावर कण्हल्याप्रमाणे सुस्कारा सोडतो.) काय झालं तुम्हाला अनिरुद्ध ?

अनिरुद्ध : ठीक आहे काकासाहेब. कुंदाचं पहा तुम्ही. ती दुःखी आहे.

आई : अनिरुद्ध, मला सगळं माहित आहे. कुंदाचं अंतःकरण मी ओळखलं होतं. तिचं तुमच्यावर प्रेम आहे.

अनिरुद्ध : सांगितलं तें कुंदानं. आई, तुम्ही तिच्या सुखाचा विचार करा. मलाहि तुम्ही ओळखतां–माझं सगळं तुम्हाला माहित

आहे. माझ्याच्यानं संसाराची जबाबदारी पार पाडली जाणं खरंच शक्य नाही. विनाकारण तिचं सगळं आयुष्य दुःखाचं होईल.

आई : तिचं सुख तुमच्या हातीं आहे. तुम्ही जर तिची निराशा केलीत—

कुंदा : आई, तूं नको माझ्याकरिता पदर पसरूं. माझं मी सहन करीन. त्यांना तत्त्वज्ञान समजतं. भावना नाही समजत. त्यांना एकाकी, निर्घोर, कुणाची फिकीर नाही, कुणाची जबाबदारी नाही असं आयुष्य हवं आहे. ध्येयवादाच्या बुरख्याआड सगळी बेजबाबदार वृत्ति लपवायची आहे. समाजसेवेच्या नांवाखाली आपलं दुबळेपण लपवायचं आहे. आनंदरावांनी नाही नाही त्या कल्पना त्यांच्या डोक्यांत कोंबल्या आहेत. ते नाही ऐकायचे. नकोग, माझ्याकरिता नका तुम्ही त्यांचीं आर्जवं करूं. आई माझं ठीक आहे ग.

[ उठून जाऊं लागते. 'कुंदा असं काय वेडयासारखं करतेस' असं म्हणत तिची समजूत घालण्याकरिता आई तिला अडवते. अनिरुद्ध तेवढया वेळांत आपल्या खोलींत निघून जातो. कुंदा अखेर परत येऊन बसते. ]

आई : कुंदा, अशी हवालदील झाल्यासारखी वागूं नकोस. आम्ही तुझीं मायेचीं माणसं तुझ्याजवळ आहोंत.

कुंदा : प्रेमावाचून कांही कुणी मरत नाही. आणि मेलं तर कांही बिघडत नाही. दुसऱ्यांचीं आर्जवं करायचीं, पदरांत घ्या म्हणायचं, मी तुमच्या पायाची दासी होते, मला हात द्या म्हणून विनवायचं आणि त्यांनी खुशाल लांब लांब गोष्टी ऐकवायच्या—आई, नाही ग सहन करवत (उद्वेगाने ओंजळींत तोंड लपवते. आई जवळ येऊन प्रेमाने तिच्या पाठीवरून हात फिरवते.) आई, त्यांना म्हणावं मी चांगली आहे. मला कांही झाल नाही. तुम्ही येण्यापूर्वी मी सुखी होतें आणि तुम्ही

गेल्यावरही (अनिरुद्ध कपडे चढवून खोलीच्या दारांत उभा असतो.) मी सुखी राहीन! माझं अंत:करण असं पायदळीं तुडवायला मी टाकलेलं नाही.

अनिरुद्ध : कुंदा अशी रागावूं नकोस. क्षमा कर मला. मला माहित आहे की मी अपराधी आहे. तुम्ही सर्वांनी मला प्रेमानं वागवलं, माझी इतकी शुश्रूषा केली तें स्वीकारण्याचा मला कांहीच अधिकार नव्हता. काकासाहेब, तुमचे उपकार मी जन्मोजन्मीं विसरूं शकणार नाही. जातों मी आपल्या घरीं. माझं सामान आनंद घेऊन जाईल.

काका : हें काय अनिरुद्ध? असं काय करतां? तुमच्या प्रकृतिकरता--

अनिरुद्ध : होईल बरी प्रकृति. तुम्ही नका काळजी करूं. (जाऊं लागतो.)

कुंदा : आई, मी कांहीचं कांही बोललें ग. तूं सांग ना त्यांना.

अनिरुद्ध : कुंदा, जरा धीरानं वाग. लवकर विझवण्याकरताच माझी जीवनज्योत वेगानं जाळतों आहे मी.

काका : अनिरुद्ध, असं काय करतां ! (हात धरून परत आणतात) खरं सांगूं? आपण पुरुष एका विशिष्ट दिशेनं खूप पुढे जातों, खूप विकास करून घेतों. पण इतर बाबतींत आपली स्थिति एखाद्या अजाण बालकासारखी असते. तुम्हाला नाही वाटत की तुमचं आताचं वागणं अगदी एका अजाण बालकाप्रमाणे झालं ?

अनिरुद्ध : अजाण तर खराच ! आपलं चुकलं तरी आपल्याला कळत नाही. (काका त्याला खुर्चीवर आणून बसवतात.) जीवनाचा खरा अर्थ आपल्याला वेळेवर कळत नाही. आपण अतिरेकाला जातों आणि मग इलाज नसतो. माझंहि कुठं तरी चुकलं आहे. खोलांत भयंकर वेदना होतात. पण कां तें कळत नाही. काका, मला ह्या सगळ्या गोष्टींचा अर्थ कधीच कळणार नाही कां ?

आई : अनिरुद्ध, तो विषयच जाऊं द्या आता. तुम्ही आणि कुंदानं अगदी कांहीच झालं नाही असं समजायचं आणि आतापर्यंत ज्या चांगल्या तऱ्हेनं एकमेकांशीं वागत आलां तसं वागायचं. समजलीस नं कुंदा ?

[ चंदू गडबडीने येतो व दिवाणखान्यांत पाहतो. ]

चंदू : आं आनंदराव कुठं हैती ? हतं आले व्हते नव का ?

अनिरुद्ध : कां कचेरींत नाही कां ?

चंदू : बगतो जाउन शान. हतं आले व्हते नव का ?

अनिरुद्ध : तो तर मघाच गेला. तूं कुठून येतो आहेस ?

चंदू : तात्यासायबांच्या इतूनच आलों. पन् तसा नाई आलों. गणपतरावास्नी त्याईच्या पासी बसवलं अन् मंग आलों आनंदरावास्नी सांगाया.

अनिरुद्ध : काय सांगणार होतास तूं आनंदाला ?

चंदू : पन् आनंदराव म्हणाले व्हते की काय बी होलं तरी मस सांगजो, सायबास्नी नाई.

अनिरुद्ध : काय झालंय ?

चंदू : पन्—

अनिरुद्ध : सांगना काय झालंय तें.

चंदू : तात्यासाईब पायटेपासून चिडून चिडून लई वरडले अन् मंग झीट येउन शान एकदम पल्ले. हात न् पाय अगदी लाकडवानी झाले हैत. म्हून—

अनिरुद्ध : आणि मला न सांगतां तूं जाणार होतास ? मूर्ख कुठचा ! काकासाहेब, मला गेलंच पाहिजे. कुंदा माझ्यावर रागावूं नकोस. काकासाहेब, तुम्ही कुंदाची समजूत घाला. जातों मी.

[ चंद व अनिरुद्ध जातात. ]

# ४

[ काकासाहेबांच्या दिवाणखान्यांत कुंदा, तिची आई व बेबी बसल्या आहेत. कुंदा आणि बेबी नुकत्याच कॅरम खेळून उठल्या आहेत. ]

बेबी : ए आई, ही ताई की नाही खेळतांना खूप लबाडी करते ग. माझी गोटी मुद्दामहून अशा ठिकाणीं नेऊन ठेवते की मग नाही मला घेणं जमत.

कुंदा : आता रडगाणं कशाला गाता बाईसाहेब ! पैज लावून खेळत होतीस नं ? छान जिरली ! छान जिरली !

बेबी : बघ न ग आई. अशानं मी खेळत नाही जाणार.

कुंदा : चिडका बिब्बा चिडला, तेलांत जाऊन बुडला--

आई : किती ग मागे लागतेस तिच्या. बेबी, आपण की नाही कुंदाचं घर उन्हांत बांधून देऊं.

बेबी : तिचंच नाही आई, तिचं आणि अनिरुद्धांचं दोघांचहि घर उन्हांत बांधायचं आणि त्यावर मेलेल्या बेटकुळयांची सावली करायची. (विजयोन्मादाने टाळ्या वाजवते.) आई, मी अनिरुद्धांच्याच जवळ ताईचं गाऱ्हाणं सांगणार आहे.

कुंदा : पहा बरं बेबी ! अशानं मी गडी फू करीन. तें गाणं नाही शिकवणार.

बेबी : असं काग करतेस ताई, शिकव नं; तुझी शप्पत, गळ्याची शप्पत, देवाची शप्पत. आता नाही चिडवणार. शिकव नं गाणं.

कुंदा : बरं ऐक. (गाते)

( राग : जोगी )

हृदयींच्या अंधारांत
लावियेली फुलवात
तुवां आपुलिये हातीं
उजळली दिव्य ज्योती
तमांतुनी ये प्रकाश
व्यापी हृदय–आकाश
मूर्तिमधुनी प्रचीती
अमूर्ताची होई चित्तीं
फुटे शब्द निःशब्दाला
हृदयींच्या जिव्हाळयाला
हृदयींच्या मंदिरांत
लावियेली फुलवात

आई, तुला आवडलं का ग गाणं ?

आई : चांगलं आहे. गाण्यांतला अर्थहि चांगला, चालहि चांगली आणि गाणारी सुद्धा !

कुंदा : आई, मी काल अनिरुद्धांना म्हणून दाखवलं हें गाणं.

आई : मग, आवडलं कां गाणं त्यांना ?

कुंदा : त्याचीच तर मोठी गंमत झाली. प्रथम मला सुद्धा असंच वाटत होतं की अनिरुद्ध अगदी रूक्ष आहेत. खरं सांगूं, अनिरुद्ध की नाही नुसता आव आणतात.

आई : हें कशावरून ?

कुंदा : अग नाटकांत काम करण्यासाठी डोक्यावर पांढऱ्या जटा आणि हनवटीला पांढरी दाढी लावली म्हणून नट म्हातारा थोडाच होतो. तत्त्वज्ञाची भूमिका पत्करली तरी माणूस तर आहेत नं? भावना लपतात थोड्याच ! आई, त्यांना अहोरात्र तात्यांच्या जवळ बसून रहावं लागतं म्हणून—नाहीतर मी त्यांना रोज नेमानं आपल्या इथे बॅडमिंटन खेळायला लावणार होतें; माझ्यामुळे त्यांना सगळा वेळ आपलं काम बाजूला ठेवायला लावलं असतं. एवढा मला आत्मविश्वास आहे आता. अग, मी त्यांच्या त्या ग्रंथांतलीं तीं एकापेक्षा एक अवघड प्रमेयें ऐकण्याची भयंकर कामगिरी त्यांच्याकरता करतें तर ते माझ्याकरता काय एवढंहि नाही करायचे ? माझं काय वाटेल तें ऐकतील.

बेबी : आहाहा, एवढं अनिरुद्धांच्याबद्दल माहित होतं तर त्या दिवशीं एवढी रडली भोकली कशाला ? काय पण नाटक वठवलंस त्या दिवशीं ! एवढी मोठी झालीस आणि कॉलेजांत जातेस तरी अजून रडतेच. आम्हाला बाईनी बेंचावर उभं केलं तरी सुद्धा आम्ही नाही रडत. रडुबाई रडू, रडुबाई रडू—

कुंदा : बघ न ग आई, ही सदाकदा चिडवते मला.

आई : बेबी, असं चिडवूं नये. ती तुझी वडील बहीण आहे ना !

बेबी : मग ती कां चिडवते मला ? आई, त्या दिवशीं मी एका दाढीवाल्या माणसाचं चित्रं कापून आपल्या चित्रांच्या वहींत

चिकटवत होतें तर ताई म्हणाली की तुझं लग्न अशाच दाढीवाल्या माणसाशीं करून द्यायचं म्हणून.

कुंदा : मग काय झालं ! तुझ्या नवऱ्याला दाढी करण्याचं सामान अहेर म्हणून देऊं. मग तर झालं !

बेबी : आई, मूर्ख माणसंच दाढीवालीं असतात कां ग ?

आई : कशावरून ?

बेबी : आमच्या पुस्तकांत एक गोष्ट होती. एक दाढीवाला माणूस होता. आपला मूर्खपणा दाढीमुळे दिसू नये म्हणून त्यानं आपली दाढी दिव्यावर धरूनच पेटवली. सगळं तोंड जळालं त्याचं.

कुंदा : अग दाढी सगळयाच पुरुषांना असते आणि मूर्खपणाहि थोडया फार प्रमाणांत प्रत्येक पुरुषांत असतो.

बेबी : हो कां ? अनिरुद्धांच्यांत सुद्धा ?

कुंदा : तुझ्यापुढे तर बोलायचीच सोय राहिली नाही. चांगली युक्ति शोधून ठेवली आहेस मला हरवायला.

[ काकासाहेब बाहेरून परत येतात व कपडे बदलण्यासाठी आपल्या खोलींत जातात. ]

कुंदा : काका आले आई. आई उद्या तुमचा लग्नदिवस आहे नं ? (आई होकारार्थी मान हलवते)

आई : मन तीस वर्षांनी तरुण करायचं आहे आम्हांला.

कुंदा : तीस वर्षांनी तरुण ? म्हणजे तूं माझ्याएवढी होशील आणि काका होतील दादाएवढे.

बेबी : दादाच्या एवढे नाहीत, अनिरुद्धांच्याएवढे ! (काका कपडे उतरवून परत दिवाणखान्यांत येतात). काका, आई की नाही उद्या ताईएवढी होणार आहे. ताईच्यासारखं ती गोल पातळ नेसेल,

पाठीवर शेपटा सोडील, कानांत डूल घालील. खूप खूप गंमत होईल मग, नाही ?

काका : पण आम्ही ती गमत तुम्हाला दिसूच देणार नाही.

कुंदा : आई, तीस वर्षांपूर्वी तुला कसं ग वाटत होतं ?

आई : उद्या आम्ही आमच्या त्या वेळच्या डायऱ्या वाचूं आणि आठवूं.

[ बेबी आपल्या बालिश चाळ्यांत मग्न झालेली असते. ]

कुंदा : आई, आम्हाला सांग नं.

आई : कशाला ? तुम्हा पोरीबाळींना काय सांगायचं ?

कुंदा : हें ग काय आई, सांग नं. नाही तर मी चोरून तुमच्या डायऱ्या वाचीन. खरं सांगू आई. तूं माझ्या एवढी होतीस तेव्हा तुझी मन:स्थिति कशी होती हें मला पहायचं आहे.

आई : झोक्यावर बसल्यासारखी होती मन:स्थिति. क्षणांत आभाळांत तर क्षणांत पाताळांत, घटक्यांत आशेनं बहरून जावं, तर क्षणांत चिंतेनं व्याकुळ व्हावं.

कुंदा : खरं आहे आई. अगदी खरं आहे.

आई : काय खरं आहे ?

कुंदा : तूं म्हणतेस तें.

आई : (स्मित करीत) तुला काय माहीत ?

कुंदा : इतिहासाची पुनरावृत्ति होत असते आई. पण मी फार फार पुढे जाणार आहें. खरं सांगायचं म्हणजे आजच मी तुझ्याहून फार पुढे गेलें आहें.

आई : भ्रम आहे तो तुझा. आम्ही आमचा अर्धा अधिक प्रवास आटोपला आहे. आणि तुला अजून भोवऱ्यांतून बाहेर पडायचं आहे. आणि मग पुढच्या गोष्टी.

कुंदा : आई, तूं तेव्हा खूप आशावादी होतीस कां ग?

आई : सांगितलं नं की आशा आणि चिंता यांत मन हेलकावे खात राहत होतं म्हणून.

कुंदा : कसची चिंता करत होतीस ग तूं?

आई : यांना परीक्षेंत अपयश आलं, नंतर वडील वारले व घरचा आधार तुटला. यांची प्रकृतिहि ढासळली आणि यांच्या डोक्यांत माझ्या भवितव्याबद्दल, सुखाबद्दल, भलतेच विचार सुरू झाले. माझ्या सुखाकरितां मला विसरणं, मला अंतर देणं, हें यांना कर्तव्य वाटूं लागलं होतं. मला यांना रडवून पाहायचं होतं!

काका : अजूनहि आपला गैरसमज कायमच दिसतो आहे.

आई : तेव्हाचं, तीस वर्षापूर्वीचं म्हणत होतें. मी तेव्हा खरं काय तें ओळखलं म्हणून ठीक. तुम्ही माझ्या भवितव्याबद्दल तेव्हा विचार करूं लागलांच होतां. मीहि तुमच्या भवितव्याबद्दल विचार करायला हवा होता. म्हणजे आटोपलंच होतं सगळं. तिकडे तुम्ही रडत बसलां असतां आणि इकडे मी रडत बसलें असतें.

काका : आणि मग कांही कालानं दोघांनीहि मनं खंबीर केलीं असतीं आणि मी आयुष्याला तोंड देऊं लागलों असतों. आल्या प्रसंगाला तोंड द्यायलाच हवं. (काका बोलतात तेव्हा कुंदा स्वप्नाळू अवस्थेंत असते. आईच्या बोलण्याने नाजूक अन् गोड तरंग तिच्या मनांत उठलेले असतात.)

कुंदा : किती सुखान्त ठरला तो स्वार्थत्याग! त्या स्वार्थत्यागांत आपलं खरं सुख आहे हें तूं आधी ओळखलं होतंस कां ग?

आई : आधी काय कळतं आपल्याला? अंधारांत माहित नसलेल्या वाटेवर आपण पाऊल टाकतों. (क्षणभर थांबून) तुला बाहेर नाही जायचं कुंदा? जाणार आहेस कां अनिरुद्धांच्या घरीं?

कुंदा : जाऊं?

आई : तो तुझ्या खुषीचा प्रश्न आहे. मी काय सांगूं? नाही म्हणालें तर राग यायचा माझा, त्यापेक्षा न बोललेलंच बरं. बोलून अवज्ञा करून घेण्यांत काय तात्पर्य आहे?

कुंदा : मी कधी ग नाही ऐकलं तुझं? असे भलते आरोप नाही करूं द्यायची. (वर माडीवर जाऊं लागते.)

बेबी : मला घेऊन चल नं ग ताई.

कुंदा : (जिन्यावरून) मग माझी थट्टा करायला अन् चिडवायला नं?

बेबी : तुझी शप्पत ताई, कध्धी कध्धी नाही चिडवणार. येऊं नं?

कुंदा : बरं चल.

बेबी : मग माझीहि वेणी घालून दे. (ती व कुंदा दोघीहि वर जातात. त्या निघून जाईपर्यंत आई व काका दोघंहि जिन्यावर लक्ष ठेवतात व निघून गेल्याची खात्री झाल्यावर)

काका : तुला तुझी कथा विचारण्यांत कुंदाचा हेतु होता.

आई : तिची चित्तवृत्ति जाणतें मी. अशा प्रसंगीं मन घटकेंत व्याकुळ कसं होतं आणि घटकेंत हुरळून कसं जातं तें मी विसरलें नाही. एक गोष्ट कळली कां आपल्याला?

काका : काय?

आई : अनिरुद्धांचंहि कुंदावर अतिशय प्रेम आहे. त्यांनी तिला त्याबद्दल कबुली देऊन टाकली आहे. तो ग्रंथ तीं दोघं मिळून तयार करणार आहेत. कुंदा सांगत होती की तो ग्रंथ दोघांनी मिळून तयार करण्याचं त्यांनी एकमेकाला वचन दिलं आहे म्हणून. (काकासाहेबांचा चेहरा चिंतेनं व्यापलेला आहे.) आपल्याला अजून चिंता वाटते?

अनिरुद्धांचेंहि कुंदावर प्रेम आहे हें कळल्यापासून माझी अर्धी काळजी दूर झाली. नाही तर मला रात्रीं धड झोप सुद्धा येत नव्हती. (काकासाहेब न बोलतां विषण्णतेने चिरूट ओढत येरझारा घालत राहतात.) कुंदाची ही आनंदमय स्थिति पाहून आपलं अंत:करण हलकं नाही झालं?

काका : माझी काळजी दुपटीनं वाढली. तीस वर्षे अगदी सुखासमाधानांत काढलीं आपण, पण आता मात्र—

[बोलणं थांबवून पुन: येरझारा घालूं लागतात.]

आई : सांगा नं काय सांगत होतां तें. काय कळलं आपल्याला? (काका बोलत नाहीत.) आपलं बोलणं ऐकल्यापासून माझ्या काळजांत धस्स झालं आहे. सांगा नं काय झालं तें?

काका : तुम्ही आपलं मन खंबीर करायला हवं. आणि आल्या प्रसंगाला तोंड द्यायला तयार राह्यला पाहिजे.

आई : काय झालं सांगा नं.

काका : एका भयंकर आपत्तीला आपल्याला तोंड द्यायचं आहे. कुंदावर भयंकर आघात होणार आहे हें आता निश्चित होऊन चुकलं आहे. तिला त्या आघातापासून वाचवणं आता अशक्य आहे. तो आघात सहन करण्यासाठी तिचं मन तयार करायला हवं.

आई : काय झालंय् असं? माझा तर जीव अगदी घाबरून गेला आहे. सांगा नं.

काका : तूंच जर अशी घाबरून जाऊं लागलीस तर कसं होईल? ह्या वेळेला तर तूं मनाचा धडा करायला हवा आणि खंबीर मनानं आल्या प्रसंगाला तोंड द्यायला तयार झालं पाहिजे.

आई : काय झालं सांगा नं.

काका : मागेच मला संशय आला होता. पण मी तेव्हा

बोललों नाही. पण तो संशय आता खरा झाला आहे. अनिरुद्धांना क्षय झालेला आहे.

आई : काय, क्षय झाला आहे ? मग आता कसं करायचं ? मग ताबडतोब इलाज करायला लागा नं. नाही तर आणखी कुठं घेऊन चला त्यांना ताबडतोब.

काका : क्षय होऊन आठ दहा महिने तरी झाले आहेत. चोवीस तास त्यांच्या अंगांत बारीक ताप असे. आणि आता दोन्हीहि फुप्फुसं पार खराब होऊन गेलीं आहेत. पाठीचा कणा आणि बरगड्यां-च्यावर सुद्धा क्षयाचा परिणाम झाला आहे. मागे एक दिवस ते म्हणाले नव्हते कां की स्वप्नांत कोणीतरी एकदम पाठींत खंजिर खुपसतं आहे असं दिसतं म्हणून. तो रोग झाला म्हणजे अशीं स्वप्नं वारंवार पडतात. आज उद्यांत येईलच त्यांचा हेल्थ रिपोर्ट. पण डॉक्टर गुप्त्यांच्या घरीं गेलों तेव्हाच त्यांनी खरी स्थिति सांगून टाकली.

आई : पण अजून ताबडतोब उपचाराला लागलं तर नाही कां होणार ?

काका : अनिरुद्धांना माहीत नाही की आपल्याला क्षय झालेला आहे म्हणून. आणि तें त्यांना कळतां कामा नये. अनिरुद्धांना कितीहि म्हटलं तरी ते तात्यांना सोडून हवा बदलायला जायला तयार होणार नाहीत. मोठी कठिण स्थिति आहे.

आई : काय वाटेल तें करा आणि अनिरुद्धांना उपचाराकरता येथून न्याच. आता वेळ घालवूं नका. लागल्यास त्यांच्या दुखण्याचं स्वरूप किती भयंकर आहे हें त्यांचं त्यांना सांगून टाका. पण येथून चलायला भाग पाडाच.

काका : तें तर झालंच. तसं करण्यावाचून गत्यंतर नाही. पण

प्रसंग कुंदावर आहे. तिला आज ना उद्या ही गोष्ट कळेलच आणि मग बिचारी पोर--

आई : ही गोष्ट कुंदाला कळू देऊं नका. सगळं अगदी तिच्या पासून लपवायचं.

काका : पण किती दिवस हें लपून राहणार ? आज ना उद्या ही बातमी कुठून ना कुठून तिला कळणारच. मला वाटतं की मीच तिला बोलावून केव्हाना केव्हा ही गोष्ट सांगून टाकावी अन् तिचं मन आल्या प्रसंगाला तयार करावं.

आई : आपण सांगू नये. अनिरुद्धांचं दुखणं भयंकर स्वरूपाचं आहे ही गोष्टच तिला कळू द्यायची नाही. आणि अनिरुद्धांना क्षय झाला आहे असं जरी कळलं तरी तिला सांगायचं की कांही काळजी करण्यालायक नाही म्हणून. होऊन जातील बरे.

काका : पण तिच्या आशा बहरूं देणं म्हणजे अधिक तीव्रतर दुःखाला आव्हानच नाही कां ?

आई : मनुष्यानं नेहमी चांगल्याची आशा करावी. कदाचित् सुधारतीलहि अनिरुद्ध. आपण दुखणं इतकं निराशाजनक असल्याचं कुंदाला सांगू नये.

[ शरद् येतो. ]

काका : या शरद्. बऱ्याच दिवसांत आलांत ?

शरद् : यायचं हजार वेळां मनांत आलं हो, पण प्रत्येक वेळीं कुठेना कुठे माशी शिंकेच. पाहतांच आहां की जिकडे तिकडे माशा झाल्या आहेत आणि सर्द हवेमुळें त्या फटाफट शिंकतात. (हसतो.)

काका : परभारें घरून आलांत की अनिरुद्धांच्या घरीं गेला होतां ?

शरद् : आलों परभारें आपल्या घरूनच. पण सकाळीं जाऊन आलों होतों तात्यांच्या समाचाराला.

काका : मग काय खबरबात आहे ?

शरद् : लक्षण कांही ठीक नाही. सकाळीं त्यांनी एकदम हातपाय वाकडे केले अन् बस्स ! वाचा गेली आहे आणि सर्वांग अगदी अधू होऊन गेलं आहे. अनिरुद्धाची स्थिति मात्र मोठी केविलवाणी झाली आहे. आधीच त्याची प्रकृति ठीक नाही. आणि अहोरात्र तात्यांची चिंता. दोन घटका निश्चिंतपणें झोपेल तर शपथ. आणि शक्य तितक्या लवकर तो ग्रंथ लिहून पूर्ण करण्याचा त्याने ध्यास घेतला आहे. काय एक एक फॅड आहे पहा. त्यापायीं त्याला कशाची मुळीं फिकिरच नाही. न खाण्यापिण्याची न विश्रांतीची न आपल्याला भेटायला येणाऱ्या मित्रांची. मी बोलायला गेलों तर ऐकलं न ऐकल्या-सारखं करून आपली लेखणी चालू ठेवली. मी तर चिडून गेलों त्यापायीं. त्या लोकांना काय वाटतं की त्याच्या त्या ग्रंथाचं इतकं मोठं महत्त्व आहे आणि मला तें समजतच नाही !

[ कुंदा प्रवेश करते. ]

कुंदा : अरे वा, कोण शरद् ? बरेच दिवसांत उगवलात ?

शरद् : पण उगवलों न ? झालं तर. अगदी कायमचा अस्ताला गेलों असतों तर म्हणायचं होतं. अगदी सूर्यासारखं आहे माझं. मावळलों तरी पुनः उगवतोंच. ( हसतो. )

कुंदा : आणखी कशाच्या बाबतींत तुमचं सूर्याशीं साम्य आहे ?

शरद् : साम्य जरी नसलं तरी चंद्र सूर्याच्या प्रकाशामुळें प्रकाशित दिसतो तसंच सूर्य माझ्या प्रकाशामुळें प्रकाशित दिसतो. ( हसतो ) मी नसतांना मला सूर्यप्रकाश कधीच दिसला नाही.

कुंदा : मग रात्रीं कुठे जातो तुमचा प्रकाश ?

शरद् : रात्रीं बायको ग्रासून टाकते हो म्हणून—( हसतो )

कुंदा : काय हें शरद् ! कमाल आहे तुमची ! तुम्ही कोटया करूं लागलांत की मग —

शरद् : मग काय, एकावर एक हजार कोटया करूं लागेन. आहेच माझी बुद्धिमत्ता तशी. पण या लोकांना तें अद्याप पटलंच नाही. आनंद नि अनिरुद्ध यांना वाटतं की त्याच्या त्या ग्रंथाचं महत्त्व कळण्याची माझी लायकीच नाही.

कुंदा : कोणतं तत्त्वज्ञान अनिरुद्ध त्या ग्रंथांतून मांडणार आहेत, माहीत आहे का तुम्हाला शरद् ?

शरद् : माझ्या डोक्यांत हो त्यांतलं काय शिरणार आहे ?

कुंदा : आताच आपल्या बुद्धिमत्तेची महती गात होता नं ?

शरद् : तसा मी बुद्धिमान् आहे हो, पण तत्त्वज्ञान ऐकूं लागलों की येऊं लागते झोप आणि मग तत्त्वज्ञान समजायला लागणारी बुद्धिमत्ताच शिल्लक राहत नाही. ( हसतो )

कुंदा : त्यांचं तत्त्वज्ञान अगदी थोडक्यांत सांगतां येईल आणि कुणालाहि तें समजेल असं आहे. अहो मनुष्य खूप व्यवहारी असला तरी सुद्धा निदान स्वत:च्या जीविताबद्दल तरी त्याला विचार करावाच लागतो ना ? अनिरुद्धाचं तत्त्वज्ञान व्यवहारी जीवनाबद्दलच आहे. स्वत:ची भूमिका अधिकाधिक प्रभावी कशी करावी हेंच सांगतं त्यांचं तत्त्वज्ञान.

शरद् : कुंदाताई, मला तुमच्याबद्दल भयंकर कौतुक वाटूं लागलं आहे. अनिरुद्धाजवळून तें तत्त्वज्ञान समजून घेण्यांत द्रोणागिरी उचलणाऱ्या हनुमानाप्रमाणे तुम्ही अगदी अचाट पराक्रम केलेला आहे. ( हसतो. )

कुंदा : मग तुम्हाला काय वाटलं होतं? मी काय एक साधारण व्यक्ति आहे, असं वाटलं होतं की काय तुम्हाला? मी आणि अनिरुद्ध दोघं मिळूनच तो ग्रंथ लिहून काढणार आहोंत. कोणचा भाग मी लिहायचा आणि कोणचा त्यांनी लिहायचा हें आम्ही ठरवून सुद्धा टाकलं आहे. मी लिहिलेला भाग वाचून पहा म्हणजे दिपून जाल अगदी.

शरद् : पण मी तर आधीच दिपून गेलों आहे. मला वाचायला दिसेल तेव्हा ना! (हसतो.)

कुंदा : आमचं काम तर इतकं हसत खेळत होणार आहे की काय सांगूं? तुम्हाला काय वाटतं की अनिरुद्ध स्वभावानं अगदी रूक्ष आहेत? खोटा आव आणून दुसऱ्याला बनवतात ते. चेहरा गंभीर न केला तर त्यांना तत्त्वज्ञ कोण म्हणेल? आणि तत्त्वज्ञ न म्हटलं तर त्यांच्या ग्रंथाबद्दल आदर कुणाला वाटेल? पण मी ओळखून आहे त्यांना. माझ्याजवळ नाही चालत त्यांची लपवाछपवी. अगदी प्रामाणिकपणें कबुली द्यावी लागते त्यांना.

शरद् : खरंच कमाल आहे बोवा तुमची. आज चोराची कबुली घेतां आहांत उद्या बन्दिवान् कराल!

कुंदा : त्यांनी आपला सिद्धान्त मला समजावून सांगितला तेव्हा एक खूप मोठी गंमत झाली. त्यांची एक खूप मोटी चूक मी त्यांच्या नजरेला आणली आणि ती त्यांना कबूल करावी लागली. ते काय म्हणाले की आपण जलाशयांत एखादा खडा टाकला म्हणजे ज्या ठिकाणीं खडा टाकला तेथून एकाहून एक मोटीं वर्तुळ निघतात. आणि सगळयांत पुढचं वर्तुळ सपूर्ण जलाशय व्यापून टाकतं—आपलं ज़ीवन अगदी तसं एककेंद्री वर्तुळांनी व्यापलेलं आहे. अगदी संकुचित वर्तुळ म्हणजे हा आपला जीवधारी देह, नंतरचं वर्तुळ म्हणजे आपलं कुटुंब, नंतर आपला समाज, नंतर आपला देश, नंतर संपूर्ण मानव-

जात—आपलं स्वत:चं जीवन व्यापक होत होत, शेवटीं विश्वव्यापी होतं. स्वत:बद्दल विचार करता करतां संपूर्ण विश्वाचा विचार करावा लागतो.

शरद् : काय वाटेल ते सिद्धान्त काढतात बोवा हे लोक. मग अनिरुद्धाची चूक आली की नाही त्याच्या लक्षांत? मी तो सिद्धान्त चूक आहे असं म्हणालों असतों तर चिडलाच असता माझ्यावर. तुम्ही म्हणालांत म्हणून ठीक झालं.

कुंदा : अहो सिद्धान्त चूक आहे असं नाही म्हणालें मी. अनिरुद्ध स्वत: चुकले असं म्हणालें मी.

शरद् : अहो अनिरुद्ध चुकला आहे हें तर उघडच आहे. तें काय सांगायला थोडंच हवं!

कुंदा : होय नं? मीहि तेंच म्हणालें. अनिरुद्धांचं काय होत होतं की त्यांचं सगळं लक्ष लागलं कळसाकडे आणि दुर्लक्ष झालं पायाकडे.

शरद् : म्हणून शेवटीं हें असं होण्याची वेळ आली!

कुंदा : नाही तर काय! अहो कुटुंबजीवन हा तर विशाल जीवनाचा पायाच आहे. मी तर त्यांना आकाशांत भरारी घेणाऱ्या पक्ष्याचा दृष्टान्त दिला. तो उंच वातावरणांत भराऱ्या मारणारा पक्षी निवाऱ्याकरता आपलं चिमुकलं घरटं उभारून ठेवत असतो. वेळ आली म्हणजे पाहूं असं म्हणून नाही चालत. माझं बोलणं इतकं तर्क-शुद्ध होतं की तें अनिरुद्धांना कबूल करावंच लागलं.

शरद् : जादूगार आहांत बोवा तुम्ही. त्या आकाशांत भराऱ्या मारणाऱ्या पाखराला दावणीला आणून बांधलंत आणि माणूस बनवलंत. (हसतो) पण हें माहित आहे कां तुम्हाला की अनिरुद्धानं काम करण्याचा पुन: अतिरेक करायला सुरवात केली आहे.

कुंदा : हें असंच होतं शरद् ! लिहिण्याची स्फूर्ति आली की मग देहाची शुद्ध राहत नाही, झोप अन् विश्रांति नकोशी होऊं लागते आणि फार तर काय, कुणी भेटायला बोलायला आलं तर कपाळाला आठया पडतात. अहो, मी अनिरुद्धांना भेटायला गेलें म्हणजे त्यांच्या चेहऱ्यावर एकदम आनंद प्रकट होतो असं वाटतं तुम्हाला? छे, प्रथम तर काम बाजूला ठेवावं लागलं म्हणून विरस होतो त्यांचा. मग हळूहळू स्वारीची कळी खुलवावी लागते. एकदा कळी खुलली म्हणजे मग त्यांच्याशीं तासचे तास बोलत राहिलं, तरी नाही कंटाळायचे ते. मी तर अगदी बरोबर ओळखून ठेवला आहे त्यांचा स्वभाव. काम बाजूला ठेवण्याचा मी वारंवार त्यांच्यावर जुलूम करते आणि त्यांना तो निमूट-पणें अन् राजीखुषीने सहन करावा लागतो. अहो, न करून कुणाला सांगतील?

शरद् : आता हा जुलूम तुम्ही आणखी वाढवा बोवा; त्या शिवाय नाही तो विश्रांति घेणार आणि त्याची प्रकृति सुधारणार. जितका जास्त जुलूम कराल तितका लवकर ताळयावर येईल.

कुंदा : खरं सांगायच म्हणजे तात्यांच्या आजारीपणामुळं त्यांच्या प्रकृतिवर ताण पडतो आहे. उलट त्यांच्या त्या ग्रंथाच्या कामामुळं तो ताण थोडा तरी कमींच होत असेल. त्यांच्या प्रकृतीला आराम हवा. पण खरी अडचण तात्यांच्या आजाराचीच आहे. माझी तिथे कांहीच मात्रा चालत नाही.

[ चंदू चिठ्ठी घेउन येतो व ती कुंदाच्या स्वाधीन करून जातो.]

शरद् : कुणाची, अनिरुद्धाची चिठ्ठी आहे?

[ कुंदा वाचत असते. वाचतां वाचतां तिचा चेहरा प्रथम खरकन् उतरतो. नंतर रागानं ती चिठ्ठी चुरगळते. पुनः चुरगळलेली चिठ्ठी उकलते न पुनः वाचते.]

काका : काय आहे ग ?

कुंदा : पुरुषी दुष्टपणा ! मला शहाणपणा शिकवताहेत !

आई : काय झालं कुंदा ? काय लिहिलं आहे अनिरुद्धांनी ?

कुंदा : पुनः तेंच नाटक ! पुनः त्यांना मला रडवायचं आहे. पुन: त्यांना माझी केविलवाणी अवस्था झालेली पाहायची आहे. ढोंग सगळं ! माझ्या भवितव्याचा त्यांनी विचार करायला सुरवात केलेली आहे. माझं सुख आणि हित कशांत आहे तें मला बजावताहेत. त्यांना माझी कीव येते आहे पण मला रडवावंसं वाटतं आहे.

आई : काय लिहिलं आहे कुंदा !

कुंदा : मला मन आवरण्याचा त्यांनी मोठया गंभीर शब्दांत संदेश दिलेला आहे. मी मन आवरावं, त्यांच्या भेटीला सुद्धा जाऊं नये, त्यांची आठवण येऊं नये म्हणून सदैव कांही तरी कामांत मग्न रहावं, आणि आपल्या आयुष्याला कांही तरी महत्त्व आहे, आपण कांही तरी ध्येय ठेवून त्याला वाहून घ्यावं असा मोठा संदेश मला देताहेत ! सगळं ढोंग आहे—स्वतःबरोबर दुसऱ्याचीहि फसवणूक करताहेत ! स्वतः दुःखाला तर आव्हान देतातच आहेत पण मलाहि दुःखांत दुष्टपणें लोटूं पाहतात आहेत. मला रडवण्याची आणि रडलेलं पाहण्याची यांना हौस आहे कां ग ?

आई : तूं भेटायला येऊं नयेस असं लिहिलं आहे त्यांनी ?

कुंदा : हो, लिहितात काय की माझ्या भोवतालचं वातावरण विषारी आहे. मन खंबीर करून तूं माझ्या संसर्गापासून दूर राहिलं पाहिजेस. केवढी माझी फिकीर ! यांना वाटतं की बुडत्याला वर ओढायला आपण त्याला दोर बांधला आहे. पण त्या दोराचा फास लावतात गळयाला.

आई : कुंदा, बरोबर लिहिलं आहे अनिरुद्धांनी. तुझ्या भवितव्याचा आणि हिताचा विचार करूनच लिहिलं आहे त्यांनी.

कुंदा : आई तूंच बोलते आहेस कां ग हें? उद्या तुमचा लग्नदिवस आहे. तीस वर्षांनी तूं उद्या तरुण होणार आहेस. पण आज आणखी तीस वर्षांनी पुढं गेलं आहे तुझं मन.

आई : हो कुंदा, आणखी तीस वर्षे पुढचा विचार करूनच बोलतें आहे मी. अनिरुद्ध म्हणतात तेंच रास्त आहे.

कुंदा : स्वतःचं तरुणपण विसरलीस. काकांनी अगदी अनिरुद्धांच्याच प्रमाणें म्हटलं तेव्हा तुला काय वाटलं होतं आणि तूं कोणत्या मार्गाचा स्वीकार केलास हें आता नाही ना तुला आठवत?

आई : कुंदा, माझी गोष्ट वेगळी होती. तुझा प्रश्न माझ्या प्रश्नासारखा नाही.

कुंदा : तुम्हा वडील माणसांना हेंच वाटतं! तुम्हाला वाटतं की आपलं तें सर्व समर्थनीय! आपलं कधी चुकलं नाही. पण अगदी तसंच तुमची मुलं करूं लागलीं तर तें तुम्हाला रुचायचं नाही. तुम्हाला तें वावगं वाटेल. मी तुझ्या पावलावर पाऊल टाकत आलें आणि जसं तूं केलंस तसंच--

आई : कुंदा, मी केलं तें तुला नाही करतां यायचं ग.

कुंदा : मी केलं तें तुला करतां यायचं नाही! तुम्हा लोकांना वाटतं आपली पिढी खंबीर लोकांची होती. धैर्यशाली आपणच काय ते होतों. खंबीरपणाचा सगळा मक्ता जुन्या पिढींतल्याच लोकांना नाही मिळाला.

आई : तू खंबीर आहेस ना कुंदा? मग असा त्रागा कां करतेस? अनिरुद्धांच्या त्या पत्रानं तुझा इतका कां तोल सुटावा? तुला असं वाटतं कां की अनिरुद्धांनी जें लिहिलं आहे तें तुझ्या हातून होऊं शकणार नाही? इतकं हवालदिल झाल्यासारखं वाटतं तुला?

कुंदा : ध्येयाला वाहून घे! मला विसर! माझी काय चेष्टा लावली आहे का ग यांनी? त्या दिवशीं तो फार्स केला अन् मला

रडवलं. त्यांना जर मला रडवायचंच असेल तर या म्हणावं अगदी तुमची तृप्ति होईपर्यंत रडतें. यांना तोच दुष्टपणा पुनः पुनः कां करावासा वाटतो तें मी सांगतें. यांना स्त्रीला लाचार बनवून सोडायचं असतं. स्त्री यांच्या पाया पडली, टाहो फोडून दयेची याचना करूं लागली म्हणजे यांचा पुरुषी आत्मा थंड होतो.

आई : काय असं वेड लागल्यासारखं करतेस कुंदा. जरा थंड डोक्यानं विचार कर. त्यांच्याहि म्हणण्याचा योग्य तो अर्थ समजून घे. ते काही तुझा छळ करायला असे वागत नाहीत.

कुंदा : नाही, भूतदयेनं प्रेरित होउन, स्वतःच्या कल्याणा-करता-माझ्या कल्याणाकरता-जगाच्या कल्याणाकरता असं करताहेत ! पुरे झाला तो शब्दच्छल. त्यांना जर माझं तोंड पाहायचं नसेल तर तुम्हाला नकोसं वाटणारं तोंड दाखवायला मी उतावीळ झालेलें नाही. वटवाघुळाप्रमाणें तोंड लपवून बसेन मी. माझ्या यातना असह्य झाल्या तर स्वतःला कोंडून घेईन, मुक्यानं सहन करीन पण पुनः तुमच्याजवळ रडायला आणि दयेची भीक मागायला येणार नाही. तुम्हाला जग जिंकायला जायचं आहे. जा म्हणावं. धोंड होऊन मी तुमच्या वाटेंत दगडासारखी पायदळीं पडली राहणार नाही.

[रागारागाने जिना चढून वर निघून जाते.]



[स्थळ पहिल्या अंकांतलेंच. टेबलावर पुष्कळसे ग्रंथ पसरून ठेवले असून प्रत्येक ग्रंथांतून हस्तलिखित टिपणांची पानें डोकावताहेत. आनंद पुस्तकांच्या कपाटांतून एक एक ग्रंथ काढत जातो व त्यांत असलेले टिपणांचे कागद वर ओढून तो ग्रंथ टेबलावर ठेवत जातो. एका कागदावर तो पुस्तकांची यादी तयार करत असून त्यांचा विषयाप्रमाणें अनुक्रम लावत बसलेला आहे. आनंदाचें कामांत मन रमत नाही. एखादा ग्रंथ हातांत घेऊन तो घटकेंतशीळ घालीत तर घटकेंत सिगारेटचे झुरके मारीत दिवाणखान्यांत फिरतो. व नंतर पुनः कपाटाजवळ येऊन काम सुरू करतो. चंदू दोन कप चहा घेऊन येतो. एक कप आनंदाला देतो.]

आनंद : चंदू, आधी गेला होतास तूं खोलींत ?

चंदू : नाही जी.

आनंद : जा, चहा देऊन ये. आणि पहा अनिरुद्ध काय करतो आहे तें. (चंदू चहा घेऊन अनिरुद्धाच्या खोलींत जातो. आनंद

चहापान करीत त्याच्या परत येण्याची वाट पाहतो. थोड्या वेळाने चंदू परत येतो.) ठेवला चहा? ('जी' म्हणून चंदू होकारार्थी मान डोलवतो.) काय करत होते रे साहेब?

चंदू : टेबलावर डोकं ठिऊन शान पडले हैती.

आनंद : चहा ठेवला म्हणून सांगितलं होतं की नाही?

चंदू : म्या च्या ठिवला अन् ठिवला म्हून म्हनलो बी. पन् ऐकलंच नाय अन् उठले बी नाय.

आनंद : हें सिगारेटचं पाकीट नेऊन दे आणि उठव, अन् चहा घ्यायला सांग. (चंदू आंत जाऊन थोड्याच वेळाने परत येतो.) कायरे? सांगितलं का चहा घ्यायला?

चंदू : हाक मारलं मिनं पण बोलले नाय काय बी, उठले बी नाय.

आनंद : (दारांत जाऊन साधारण हलक्या आवाजाने 'अनिरुद्ध, अनिरुद्ध' म्हणून हाक मारतो. कांहीच उत्तर येत नाही.) चंदू, मला वाटतं झोप लागली आहे. अंथरुणावरहि नाही पडला; टेबलावर डोकं ठेऊनच झोपीं गेला आहे. बरं असूं दे. झोपमोड नको करूस. (पुनः कामाला लागतो. चंदू साफसफाईच्या कामाला लागतो. थोड्या वेळाने) चंदू, गणपतरावांना निरोप कळवायचा आहे. काल संध्याकाळीं तात्या वारले आणि अनिरुद्धाची प्रकृति फार खालवली आहे. आज छाप-खाना आणि कचेरी दोन्हीहि बंद राहतील. गणपतरावांना म्हणा की इतरांनाहि सुटीचं कळवा. आणखी जरा वेळाने जा.

[ शरद् येतो. ]

शरद् : आनंद, काय करतो आहे रे अनिरुद्ध? कशी आहे त्याची प्रकृति? कालच्या नंतर बोलला होता?

आनंद : बोलला होता शरद्. दोन तीनच वाक्यं. पण अतिशय भयंकर.

शरद् : काय म्हणाला ?

आनंद : एकदा म्हणाला, अंतःकरणाची एकूण एक जखम मोकळी झाली आहे. दुसऱ्यांदा म्हणाला, बांध एखाद्या ठिकाणी फुटला तर पुनः बांधून काढतां येईल, पण आता व्यर्थ आहेरे. शरद् जन्मांत काल दुसऱ्यांदा मी अनिरुद्धाच्या डोळयांतून अश्रु ओघळलेले पाहिले. एकदा शरयूच्या मृत्यूची अन् तिचं त्याच्यावरच प्रेम होतं ही बातमी त्याला सांगितली तेव्हा आणि दुसऱ्यांदा काल. शरद्, मी आपल्याला अतिशय निधड्या छातीचा समजत होतों. पण माझंहि अंतःकरण पिळवटून निघालं. खोटं सांगत नाही, माझ्या कठोर अंतः-करणाचं भूषण वाटलं होतं मला. पण आज शरद्, माझं सगळं धैर्य पार लटपटलं आहे. अनिरुद्धाच्या समोर जाण्याचं सुद्धा मला धैर्य होत नाही. कसा धीर देऊं त्याला ? कोणच्या तोंडानं म्हणूं की दुःख विसर ? माझ्या शक्तिबाहेरचं काम आहे तें. शरद्, कुंदा यायला हवी रे ह्या वेळीं. मला वाटतं की निदान काकासाहेबांना तरी बोलावणं पाठवावं. आपण कुंदाला बोलावणं पाठवलं तर येईल कारे ती ? आपलं कुंदाला बोलावणं अनिरुद्धाला आवडलं नाही म्हणजे ?

शरद् : तात्यांच्या मृत्यूने इतका जबरदस्त धक्का बसला त्याला ?

आनंद : तात्यांच्या मृत्यूचा धक्का जबरदस्त होता अशांतला भाग नाही. पण अनिरुद्धाची मनःस्थितिच अशी झालेली होती की तो त्याला अतिशय तीव्रतेने जाणवावा अन त्याचा एकदम तोल सुटावा. अनिरुद्धाला वाटतं की आपल्यावरील प्रेमामुळंच त्याना अखेर मृत्यु आला. हीच गोष्ट त्याला भयंकर जाणवली.

शरद् : त्याला अतिशय दुःख जाणवणं साहजिक आहेरे. ( अनिरुद्धाच्या खोलीच्या दारातून आंत डोकवतो व मग पुनः परत

येतो. ) टेबलावर डोकं ठेऊन झोपला आहे. जातील चार आठ दिवस दु:खांत आणि होईल पुनः पूर्ववत्. एकटा नको बसू देऊंस जास्त वेळ. बाहेर घेऊन जात जा आणि निरनिराळे विषय काढून त्याचं मन रमव.

आनंद : वस्तुस्थिति तुला वाटते तितकी सरळ नाही. मला तर वाटतं की हा त्याच्यावर झालेला शेवटचा आघात आहे. आता अंत:करण टिकाव धरायचं नाही. सगळ्या स्मृति आता स्फोट झाल्याप्रमाणं उफाळतील. तें थोर व्यक्तिमत्त्व कोसळणार आहे.

शरद् : वेड लागलंय तुला. मूर्खासारख्या वाटेल त्या कल्पना करत बसला आहेस. त्याच त्या अनिरुद्धालाहि ऐकवत असशील. इतर कशानं जरी नाही तरी तुझ्या असल्या बकण्यानं तो खचेल यांत शंका नाही. हेंच तर असतं तुम्हा वर्तमानपत्री लोकांचं. पराचा कावळा करायचा—राईचा पर्वत करायचा—आणि काटयाचा नायटा करून दुःखं भोगायचीं. मूर्खपणा प्रत्येकाच्याच ठिकाणीं असतो पण प्रत्येकाची तऱ्हा वेगळी असते इतकंच ! (हसतो.)

आनंद : हास, आणखी हसा नं ! सगळे प्रसंग सारखेच तुला !

शरद् : हा प्रसंग गंभीर आहे हें जाणतों मी. पण आईचा मृत्यु, वडिलांचा मृत्यु, जिवलग मित्रांना अंतरणं, ज्या गोष्टींचं प्राणापलीकडे महत्व असतं त्यांना मुकणं, असले प्रसंग प्रत्येकावरच कोसळतात. चार दिवस दु:ख करायचं आणि पांचव्या दिवशीं हसत खेळत नेहमीप्रमाणं वागायचं हा तर जगाचा नियमच आहे. अरे, मनुष्य तारुण्यांत दहा मुलींवर प्रेम करतो पण त्यांपैकी एकीशींहि लग्न होत नाही त्याचं. म्हणून काय तो तारुण्यांत दहा वेळा मरतो थोडाच. (हसतो.) अरे जिचं कधी पूर्वी तोंड पाहिलं नव्हतं तिच्याशीं होतं लग्न आणि मग एक दिवस तिच्यावाचून चैन पडत नाही. (हसतो.) दुनिया आहे बाबारे ! हें जाणणारा हवा.

आनंद : तुला हसायचं असेल तर वाटेल तितका हास पण आपल्या मूर्खपणाची वर तरफदारी नको करूस. सर्वांचींच अंत:करणं इतकीं उथळ नसतात.

शरद् : आजपर्यंत तुझे असले ताशेरे हजारवेळां ऐकत आलों अन् सहन केले ते. आज मी माझ्या वर्तनाचं समर्थन करणार नाही. तुझा मूर्खपणा तुझ्या डोळ्यासमोर उभा करून एकदा झगझगणीत अंजन घालतों तुझ्या डोळ्यांत. अनिरुद्धाला तूं आपलंसं केलंस पण त्याचं तूं भलं केलं नाहीस. वाटेल त्या कल्पना तूं त्याच्या डोक्यांत कोंबल्यास. तुझ्यापायीं कुंदासारख्या सुंदर आणि सुस्वभावी मुलीचा त्यानं अव्हेर केला.

आनंद : शुद्धिवर आहेस कां तूं? कां नशेंत बरळतो आहेस वाटेल तें ?

शरद् : जिवावर उदार होऊन तुम्हाला देशाकरतां लढायचं आहे नं ! म्हणून तुम्हाला कशाची जबाबदारी नको. तुझा इतिहास माहित आहे मला. बेजबाबदार जीवनक्रमांतलं इंगित तूं त्याला पटवलंस. फक्त तुझा बेजबाबदारपणा नग्या स्वरूपाचा होता आणि अनिरुद्धाच्या वागणुकीवर ध्येयवादाची सोज्वल वस्त्रं चढवलेलीं होतीं.

आनंद : माणसाच्या सहनशक्तीला मर्यादा असते हें विसरूं नकोस शरद्.

शरद् : कुंदानं सांगितलंय् सगळं मला. कधी आली आहे तुला तिची दया ? मी स्पष्टपणें विचारतों तुला, तूं अनिरुद्धाचं केलं आहेस कां कांही भलं ? त्यांच्या सुखाचा केला आहेस कां कधी विचार ? तुला त्यांची दु:खं कळतात हें मी मान्य करतों. पण तुला विचारतों की तूं त्याला ज्या मार्गाला लावलंस ते त्याला सुख मिळवून देण्याचे होते कां ? तूं म्हणतोस त्या प्रमाणें त्याची मनस्थिति मोठया स्फोटक स्वरूपाची.

होऊन बसली आहे हेंहि मान्य करतों मी. पण तसं होऊं नये म्हणून तूं काय केलंस ? मनावर भयंकर दडपण टाकायला आणि जें कांही दु:ख असेल तें भाराखाली दाबून ठेवायलाच लावलंस की नाही तूं ? आणि त्या दाबून ठेवलेल्या दु:खापायीं त्याची अशी भलतीच अवस्था झाली तर त्याला कोण जबाबदार आहे ? बोल आनंद, तूंच की नाही ? क्षणभर माझ्यावरचा राग विसर अन् दे उत्तर.

आनंद : तूं काय बोलतो आहेस हें सगळं शरद् ?

शरद् : मी मूर्खासारखं हसतों पण मी माणुसकी विसरलों नाही. आंधळा झालेलों नाही आनंद! तुझं अनिरुद्धावर अकृत्रिम प्रेम आहे— फार तर काय माझ्याहून किती तरी पटीनं तुझं प्रेम अधिक आहे. एकटा अनिरुद्ध हेंच तुझ्या श्रद्धेचं अन् प्रेमाचं एकमेव स्थान आहे. त्याच्या कीर्तिकरता तूं शिकस्त केलीस. पण त्याच्या सुखाचा तूं अजूनहि विचार करणार नाहीस ? अजूनहि आपल्या जुन्या चुका सुधारण्याचा प्रयत्न करणार नाहीस ?

आनंद : तू माझ्यावर इतक्या अनपेक्षित तऱ्हेनं हल्ला चढवतो आहेस की मला भांबावल्यासारखं होतं आहे.

शरद् : मला पुन: एकदा माझ्या मूर्खपणाचं—माझ्या व्यसनाचं समर्थन करूं दे. मी केवळ सवय म्हणून वारंवार हसतों. अभिजात अन् उच्च विनोद करून मला हसता येत नाही. चारचौघांच्या सारखी माझी बुद्धिमत्ता आहे. कधी ग्राम्य बोलून तर कधी अश्लीलतेची मर्यादा गाठूनहि हसतों मी. पण हसतों आणि मला हसता येतं. प्रथम प्रथम कृत्रिमपणें हसलों मी. आता तोच कृत्रिमपणा स्वाभाविक होऊन बसला आहे. अनिरुद्धाला जरा चैन करायला, चार घटका मौजेंत घालवायला आणि बेफिकिर होऊन कांही काळ भटकत राहायला तूं शिकवलं असतंस तर थोड्या अवधींत अंत:करणाला होणारी

प्रत्येक जखम भरून गेलेली, अगदी पार नाहीशी झालेली तुला दिसून आली असती. पण तूं काय केलंस ? त्या जखमेवर निरनिराळया कार्यांचं दडपण ठेवत गेलास.

आनंद : शरद् , कोणास माहीत माझं कुठं चुकलं तें. पण आता तूं पहा. तूं सांभाळ त्याला.

शरद् : ( प्रेमळ आवाजांत ) फिकिर करूं नकोस. आनंद माझ्याहून तूं जास्त निधडया छातीचा आहेस. फक्त अनिरुद्धावरील असीम प्रेमानं तुझं अंत:करण व्याकुळ झालं आहे. अनिरुद्धाला जरा मोकळया वातावरणांत आण, चारचौघाप्रमाणं 'होतंच आहे, चाललंच आहे, हेहि दिवस जातील' अशी वृत्ति त्याच्यांत निर्माण कर. मूर्खपणानं कां होईना पण चार घटका मौजेंत काढायला शिकव. आज, वडिल वारले म्हणून तो तुला खचलेला दिसतो आहे; चार दिवसांनी तुझ्या माझ्यासारखा वावरतांना दिसेल.

आनंद : तूंच पहा, अन् कर काय योग्य असेल तें. लागल्यास आपल्या घरीं घेऊन जा. तूंच बोल त्याच्याशीं. मी कुंदाला आणि काकासाहेबांना कळवून येतों. बसशील तूं तोंपर्यंत ?

[ शरद् होकारार्थी मान हलवतो. आनंद कपडे चढवतो व जातो. क्षणभराने शरद् दाराजवळ जातो व अनिरुद्धाला हाक मारतो, दोन तीन हाका मारल्यावर अनिरुद्ध उठतो व बाहेर येतो. ]

अनिरुद्ध : आनंद कुठे गेला ? आता तो तुझ्याशीं बोलत होता ना ?

शरद् : तो बाहेर गेला आहे. त्याला कांही काम होतं.

अनिरुद्ध : तो कुंदाकडे गेला आहे. तिला माझी अवस्था कळवायची आहे त्याला. तुम्ही काय बोलत होतां तें ऐकलं मी.

शरद् : तो आनंद कांही तरी मूर्खासारखं बोलत होता झालं !

अनिरुद्ध : मूर्खासारखं ? शरद्, कशाला नांवं ठेवायचीं दुसऱ्याला ? आपण सगळेच अजाण आहोंत. आपली स्वतःचीच अवस्था आपल्याला कधी नीट कळत नाही. मग ती दुसऱ्याला कुठून कळणार ?

शरद् : मी कशाकरता आलो माहित आहे तुला ! तुला मी आमच्या घरीं घेऊन जाणार आहे. चार आठ दिवस रहा आमच्या इथे.

अनिरुद्ध : तूं बोलावतो आहेस मला ! एकदा कुंदानं असंच बोलावलं होतं मला ! एका मित्रापासून मी आजपर्यंत दूर दूर होतों—त्याला म्हणत होतों थांब—थांब जरा—आणखी कांही दिवस थांब. मला जगाला कांही तरी द्यायचं आहे, तें देऊन टाकूं दे, अन् मग आपण दोघं हातांत हात घालूं—विश्वाच्या मर्यादा ओलांडूं—आणि नंतर मग पैलतीरीं--आता तो माझा मित्र माझ्या अंतःकरणाला शांति मिळवून देण्यासाठी समाचाराला यायला म्हणतो आहे. सारखी त्याची हाक ऐकूं येते आहे. किती दयाळू आहे तो ! (डोळे मिटतो) किती आग्रहानं मृत्यु बोलावतो आहे. (अनिरुद्धाचा थोडासा तोल जातो. शरद् चटकन् त्याला आवरतो.) शरद्, किती प्रेम करतां तुम्ही सगळे जण !

शरद् : हें पहा अनिरुद्ध, असं भलतं मी तुला बोलूं देणार नाही. असं काय करतोस ? दोन चार दिवसांनी होशील बरा.

अनिरुद्ध : एक काम कर शरद्, हात धर जरा माझा. मला त्या टेबलाला टेकून उभा राहूं दे. (शरद्च्या साह्याने टेबलाला टेकून उभा राहतो.) चंदूला घे आणि आंतून माझी आरामखुर्ची आण. (चंदू व शरद् अनिरुद्धाची आरामखुर्ची आणतात व त्यावर बसवतात) तो टेबलावरचा रायटिंग क्लिप बोर्ड घे—जरा कागद घे, माझी पेन आण——

शरद् : जरा स्वस्थ बस पाहूं तूं.

अनिरुद्ध : मृत्यु येण्यापूर्वी मला करतां येईल तितकं करून शकूं दे.

शरद् : असं भ्रमिष्टासारखं काय करतोस. अरे, अशीं दुःखं सगळयांच्यावरच कोसळतात. आयुष्य म्हटलं की असंच सुखदुःखांनी भरलेलं असायचं.

अनिरुद्ध : आयुष्य असं असतं म्हणतोस? मला वाटत होतं की आयुष्य एक खूप भयंकर स्वप्न आहे. एक चित्रपट खूप भरभर माझ्या डोळयापुढून सरकतो आहे. जीवन हें नांव आहे त्या चित्रपटाचं. त्या चित्रपटांत कुणाकुणाच्या प्रमुख भूमिका आहेत सांगूं? एक आईची, दुसरी शरयूची, तिसरी तात्यांची, चौथी कुंदाची, नंतर आनंद अन् तूं. सगळे माझ्यावर प्रेम करतां. कां, कोणास माहीत. जीवनच असं आहे नं! कुणाला अर्थच कळत नाही त्याचा. प्रत्येक गोष्ट कां घडते, जीवनाला भलतं वळण कां लागतं? कधीच धड उमगत नाही आप ल्याला. माझ्यावरच्या प्रेमानं तळमळत आईनं प्राण सोडला. माझा प्राण घ्या पण बाळाला सोडा हो हे तिचे भ्रमांतले शेवटचे शब्द. कुणाला म्हटले असतील रे तिनं? तिला ते दुष्ट संकेत एखाद्या अज्ञात इंद्रियानं कळले होते कां?

शरद् : कशाला ह्या जुन्या स्मृति आठवतो आहेस?

अनिरुद्ध : सांगितलं नं की तो चित्रपटच डोळयासमोरून हलतो आहे म्हणून. ( क्षणभरानं ) शरयूचं माझ्यावर प्रेम जडलं. त्या प्रेमानंच बळी घेतला नं तिचा? आणि तात्या? तेहि माझ्यावरच्या प्रेमापायीं......( डोळे मिटतो व कपाळ दाबतो—क्षणभराने ) शाप आहे कारे मला कांही? कां होतंय असं? आईला अज्ञात भीति जाणवत राहिली. खरं सांगूं? विधिसंकेत तिला कळला होता. बिचारी कुंदा! एक शीतल चंद्रिका! ती आपल्या स्निग्ध अन् उजाळलेल्या

डोळ्यांनी मला उत्तेजन देते आहे. माझ्या शापाची तीहि वाटेकरीण झाली कारे ?

शरद् : तिचं तुझ्यावर प्रेम आहे अनिरुद्ध—आणखी काय हवं ? पहा हां हां म्हणता ती तुला एकदम उत्साही अन् आनंदी बनवील. एका महिन्यांत प्रकृतीनं धडधाकट बनशील.

अनिरुद्ध : माझ्याजवळ आता काय राहिलं आहे. अल्पकाळचा मी मुशाफिर—

शरद् : तो तिचा प्रश्न आहे. ती तुझ्याशीं लग्न करायला तयार आहे. झालं तर मग.

अनिरुद्ध : तयार आहे ?

शरद् : तुझ्यासारख्या असामान्य मनुष्यावर कोण प्रेम करणार नाही ? तुझ्या कर्तृत्वाची तिला केवढी महती वाटते.

अनिरुद्ध : माझं कर्तृत्व ? (क्षणभर भ्रमिष्टाप्रमाणे पाहत राहतो.) किती भयंकर भास झाला होता मला.

शरद् : काय झालं ?

अनिरुद्ध : (उठून उभा राहतो. शरद् त्याला सावरायला पुढे होतो.) अद्याप पुष्कळ शक्ति आहे माझ्यांत. अजून तर पुष्कळ काम व्हायचं आहे माझ्या हातून. (क्षणभर थांबून) हं, तो भास सांगणार होतों नं मी तुला ? जीवनविषयक तत्त्वज्ञान मी जगाला समजावून सांगणार होतों. नाही कां ? त्या शिखरावरून मला सगळं जग दिसावं—जग काय आहे हें मला जगाला सांगतां यावं म्हणून त्या शिखरावरून मी सगळ्या जगाकडे दृष्टि टाकली आणि जग काय आहे हें सांगूं लागलों. पण शरद् तें पायाखालचं शिखरच नाहीसं झालं—(शरद् चमत्कारिकपणें पाहतो. अनिरुद्ध एकदम भानावर येतो.) शरद् मी वेड लागल्याप्रमाणं वागतो आहे कारे ? तुला काय वाटतं ?

शरद् : खरंच तर वेड लागल्याप्रमाणं बोलतो आहेस. तेव्हाच्या मी तुला सांगतों आहे की असं भलतंच बडबडूं नकोस म्हणून.

अनिरुद्ध : मला तीव्र भीति वाटली होती. माझं बोलणं वेड लागल्याप्रमाणं तर होत नसेल ? पण निजलों तरी आणि जागा असलों तरी सारखीं भयानक स्वप्नंच दिसतात मला. कुणी तरी मला बजावतं आहे की आटोप आता लवकर.

शरद् : किती विचित्र आहेस रे ! काय भलतीच समजूत करून बसला आहेस ! थांब, मी तुला जरा हसायला शिकवतों.

अनिरुद्ध : आनंद अजून नाही आला रे ?

शरद् : येईल, काय घाई आहे ?

अनिरुद्ध : मला चहा घ्यायचा होता.

शरद् : मी करून देतों. ( चंदूला बोलावतो. चंदू येतो. त्याला चहा करायला सांगतो. ) झालं, तेवढ्याकरता आनंद कशाला हवा ? तो आपल्या भानगडींत गढला असेल. तेथून लवकर सुटला पाहिजे नं. अरे अशा बाबतींत लवकर सुटका होणं कठिण असतं.

अनिरुद्ध : अशा बाबतींत म्हणजे ?

शरद् : आहे, त्याचंहि एक प्रकरण आहे. अरे बाबा, तोहि तरुण आहे. (हसतो.) कुंदाकडून कदाचित् त्या स्थळाकडे गेला असेल.

अनिरुद्ध : तूं पाहिलं आहेसरे त्याच्या प्रेयसीला ?

शरद् : मी नीट न्याहाळून पाहिलं आहे !

अनिरुद्ध : तुला काय वाटतं शरद्, करील आनंद तिच्याशीं लग्न ?

शरद् : अरे न करून कुणाला सांगतो. प्रेम म्हणजे चेष्टा नाही.

अनिरुद्ध : त्याचं आहे कां तिच्यावर प्रेम ?

शरद् : (हसतो) नाही, निष्काम कर्मयोग म्हणून तिचं रोज दर्शन घेतो, भेटतो, तिच्याबरोबर बोलतो अन् फिरायला जातो!

अनिरुद्ध : बरोबर आहे त्याचं!

शरद् : आता पटलं कां हें तुला? निदान आनंदाचं पाहून तरी दिशा बदलायला हवी होतीस. अरे बाबा, तेवढ्याकरता तर आनंदाच्या प्रेमप्रकरणाकडे तुझं लक्ष वेधत होतों मी. चला नशीब म्हणायचं की आता तरी तुझे डोळे उघडले. आतापर्यंत नाही नाही त्या कल्पना उराशीं बाळगत बसला होतास. मोठा माणूस व्हायचं ह्या कल्पनेचा अतिरेक करीत सुटला होतास.

अनिरुद्ध : हो, तेंहि खरं आहे. आता कुठलं समाधान? नाही शरद्, आता नाही थांबतां यायचं. कामाच्या प्रचंड व्यापांतच गारद व्हायचं आहे मला. मर्यादेपलिकडे गेलों आहे मी. सांग कुंदाला, की आता फार उशीर झाला आहे. आता चुका सुधारायला वेळ नाही.

शरद् : छे, अजून वेळ नाही गेली. तुझ्या भवितव्याचा प्रश्न आहे हा. तुला जर वाटत असेल की आपल्या जीविताला कांही किंमत आहे, जगांत आपल्याला कांही करायचं आहे, आपल्या मानसिक शक्तींचा ऱ्हास होऊं द्यायचा नाही तर हाच एक मार्ग आहे. तूं परत कुंदाकडे गेलं पाहिजेस आणि आपले शब्द परत घेतले पाहिजेस. ध्येयपूर्ण आयुष्याकरिता तुझा अव्हेर करतो असं कुंदासारख्या समंजस सुस्वभावी आणि सुशिक्षित स्त्रीला तूं म्हणणं म्हणजे तिचा अपमान आहे. जुन्या काळच्या त्या एककल्ली ऋषींनी म्हटलं की स्त्री हें पापाचं मूळ आहे आणि तुम्ही ध्येयवादी म्हणूं लागले की स्त्री ही आमच्या मार्गांतली धोंड आहे. दोघंहि कृतघ्नच.

अनिरुद्ध : मघा असंच संतापून आणि कडक शब्दांत तूं आनंदालाहि बोललास नं? तो तुझं बोलणं ऐकून भांबावला. आणि मी? कसं सांगूं तुला शरद्? कुंदावर माझं प्रेम आहे अंत:करणांत नुसती

खळबळ उडते आहे. पण शरद्, अतिरेक झाला आहेरे माझ्या बाब-तींत. माझ्या सहवासांत तिची भयंकर कुचंबणा होईल. अहोरात्र चिंतेंत राहावं लागेल तिला. आणि अल्पावधींतच ऐन उमेदीच्या काळांत मी निघून गेलों म्हणजे—

शरद् : आणलीस कां पुनः त्याच वळणावर गाडी? काय भलती कल्पना घेऊन बसला आहेस न माहीत. अरे, अशी प्रकृति झालेलीं माणसं धट्टींकट्टीं होत नाहीत असं थोडंच आहे. आपल्या दुखण्याचं असं काय घेऊन बसला आहेस. पूर्णपणें विश्रांति घे, औषधपाणी नीट चालू दे म्हणजे आता पधरा दिवसांत सगळीच कळा बदलून जाईल. ( आनंद परत येतो. ) विचार आनंदाला, तो सुद्धा सांगेल की तुला काळजी करण्यालायक कांही झालं नाही म्हणून. हं मग बोल, माझ्या घरीं चलतोस की कुंदाच्या? तुझं सामानहि अजून डॉ. साठयांच्या घरींच आहे नं? ( आनंद ऐकल न ऐकलंस करून सचिंत मुद्रेने उभा राहतो. )

शरद् : आनंद, तूंच सांग, जर याचं कुंदावर प्रेम आहे अन् तिचं याच्यावर प्रेम आहे तर असं वागण्यांत काय अर्थ आहे? मनाचा असा कोंडमारा करत बसण्यांत काय फायदा आहे?

आनंद : आता कसं वाटतंय् तुला अनिरुद्ध?

शरद् : आता पुष्कळ बर वाटतं आहे. तू गेल्यापासून इतका वेळ धीर देत बसलों होतों. मधून मधून गाडी मूळ वळणावर येऊं लागायची. पण आता गाडी जंक्शनकडे वळवली आहे मी. ( हसतो. ) कुणीकडे माहीत आहे कां? कुंदाकडे. ( हसतो. )

अनिरुद्ध ( आनंदाला ) कुंदा बोलली होती कारे तुझ्याशीं?

आनंद : माझ्यावर तिचा अतिशय राग आहे. मी दिसलों की तिच्या कपाळावर आढया चढतात. मला जें सांगायचं तें मी काका साहेबांना सांगितलं. कुंदा होतीच तिथे.

अनिरुद्ध : तुझ्यावरच नाही. माझ्यावरहि ती अतिशय रागावली आहे.

शरद् : रागवेल नाहीतर काय! तुझं पत्र आलं तेव्हा मी तिथं होतोंच. तुझा उपदेश भयंकर अपमानास्पद वाटला तिला. आणि ह्या नाही नाही त्या कल्पना तुझ्या डोक्यात कोंबणारा म्हणून ती आनंदावर रागावली तर त्याचं नवल वाटतं तुला?

अनिरुद्ध : नाही रे, अं हं! तसं नाही. शरद् कसं सांगू तुला? जा, जा, सांग कुंदाला—माझ्यावर रागावूं नकोस म्हणावं. मृत्यूनं क्षयाच्या जाळ्यांत पकडलं मला. मग कुंदानं दूर नको का राहायला? म्हणून मी तसं लिहिलं. शरद्, तिचा गैरसमज दूर कर. मला मरण्यापूर्वी जगाला शक्य तेवढं द्यायचं होतं. म्हणून मी असा अतिरेक करीत होतों. आनंदावर रागावूं नकोस. जा, जा, शरद् जा लवकर, सांग कुंदाला. तिला म्हणावं की अनिरुद्धावर रागावूं नकोस—(एकदम तोल जातो. शरद् व आनंद त्याला सावरतात व खुर्चीवर नीट बसवतात.) जा शरद्, कर एवढं माझ्याकरता. फार विचित्र वाटतंय् मला, कुंदा जर लवकर येऊन गेली तर--

शरद् : तूं फिकीर करूं नकोस अनिरुद्ध, मी जातों आता. (चंदू चहा घेऊन येतो. व त्यांना देतो.)

अनिरुद्ध : (चहा घेता घेता) हें चहासिगारेटचं व्यसन—तिटकारा वाटूं लागला होता तुला याचा.

शरद् : छे रे. तुझ्या फायद्याकरता म्हणत होतों मी तसं. बरं तूं फिकीर करूं नकोस. कुंदाचा राग मी दूर करतों. तिला आता घेऊन येतों. पण दुखणं आटोक्याबाहेर गेलं आहे अशी भलती कल्पना करून घेऊन स्वतःला त्रास नको करून घेऊंस. (जातो)

अनिरुद्ध : काढल्यास सगळ्या नोट्स्. आण त्या इकडे. (आनंद पुस्तकांतल्या नोट्स काढून काढून त्याच्या जवळ देत जातो.)

केवढा प्रचंड व्याप आहे हा. आणि वेळ किती थोडा! जरा कागद-पेन तर घे. घे लवकर. (आनंद लिहिण्याचं साहित्य त्याला आणून देतो.) अजून निम्मा ग्रंथ लिहायचा आहे. (लिहायचा प्रयत्न करतो. थोडावेळ लिहितो व मग डोळे मिटून घेतो व हातानी कपाळ दाबतो.) हें कां वाटतंय असं?

आनंद : डॉक्टरला बोलावून आणूं कां?

अनिरुद्ध : काकासाहेब येणार नाहीत कां?

आनंद : येतच असतील. म्हणशील तर पुनः जातो.

अनिरुद्ध : नको; तू नको जाऊंस. (पुनः लिहिण्याचा प्रयत्न करतो. लिहितां लिहिता हातातली लेखणी कागदावरून घसरते, हात वेडावाकडा होतो व लिहिणें अशक्य होतें.)

आनंद : आत्ताशी हें काम असूं दे. आरामानं पड जरा वेळ.

अनिरुद्ध : आरामानं पडलं राहण्यात सगळा वेळ घालवून कसं चालेल? (भ्रमिष्टाप्रमाणे पहात) बाहेर कुणी तरी मला न्यायला गाडी घेऊन आलं आहे. आणि माझ्या येण्याकरिता दार धडधडवून राहिलं आहे.

आनंद : कुठे? कुणी तर नाही. कांही तरी भास झाला तुला.

अनिरुद्ध : कोण आलंय तें तुला नाही दिसणार. तुला त्याची हाक ऐकूं येणार नाही. त्याचा दयाळूपणा तुला इतक्यांत कळणार नाही. शेवटचा मित्र असतो तो. दुःखाचा सगळा बोजा तो उचलतो. प्रथम तो पहेलवानी थाटांत तुमच्यासमोर उभा ठाकून सलामी देतो. तुम्ही न घाबरलांत तर पहेलवानी थाटांतच अत्यानंदानं तो तुम्हाला वर उचलतो. ती गाडी त्यानंच आणिली आहे. तोच हाका मारतों आहे. पैलतिरीं नेणार आहे तो. आई, शरयू, तात्या—सगळेजण थांबले आहेत तिथं.

[ काकासाहेब येतात. ]

आनंद : पहा काकासाहेब लवकर, अनिरुद्धाची प्रकृति झपाट्यानं खचते आहे.

काका : काय अनिरुद्ध, तुम्ही एवढे धैर्यशाली आणि तात्यांच्या मृत्यूनं इतके खचलांत ? मी तर मोठया अभिमानानं म्हणत होतों की अनिरुद्ध हा आघात अगदी हसत खेळत सहन करतील आणि शूरा सारखे पुढे सरसावतील.

अनिरुद्ध : शूरासारखाच तर पुढं सरसावतों आहे, काका ! मृत्यूला इतक्या तत्परतेनं कां भित्रा मनुष्य आव्हान देईल ?

काका : शेवटीं इतके हवालदिल झालांत तर? अहो, आपत्ति सहन करवत नाही म्हणून मृत्यूचा धावा करणं हें कांही शूराचं काम नाही. तात्यावर तुमचं अतिशय प्रेम होत म्हणून कां ते गेल्याबरोबर तुम्हाला जीवित असं नकोसं झालं? उठा, धीर धरा, मन खंबीर करा. असं दीन दुबळ्या माणसासारखं पडून काय राहता ? तुम्हाला असं खचल्यासारखं पाहिलं म्हणजे तुम्ही अनिरुद्ध आहात हें पटतच नाही मला.

अनिरुद्ध : काका, हात धरा जरा माझा, म्हणजे मी उठतों. तुमच्या शब्दांनी मला असं वाटूं लागलं की एकदम उठावं आणि लागावं कामाला. धरा हात. (काका हात धरतात. कशीबशी शक्ति लावून त्यांच्या साह्याने उठतो. एकदोन पावलें गेल्यावर एकदम तोल जातो. आनंद व काका त्याला सावरतात.)

काका : फार शक्तिपात झाला आहे. उठूं नका तुम्ही अनिरुद्ध. (पुनः त्याला सावरून आरामखुर्चीवर बसवतात. हातांत नाडी घेऊन तपासूं लागतात. इतक्यांत शरद्, कुंदा व तिची आई येतात. तपासणें आटोपल्यावर–) आनंदराव, एक कागदाचा तुकडा घ्या पाहूं. (आनंद कागद देतो. त्याच्यावर कांही मजकूर खरडतात.) चंदूला

डॉक्टर गुप्त्यांचं घर माहित आहे ? (आनंद होकारार्थी मान हलवतो व चंदूला बोलावतो. चंदू येतो.) चंदू ही चिठ्ठी घेऊन जा ताबडतोब. आणि डॉक्टर गुप्त्यांना घेऊन ये. जा लवकर. एक क्षणहि गमावूं नकोस.

अनिरुद्ध : तुम्हालाहि कळला ना ह्याचा अर्थ ? तो खूप जोराजोराने मला हाका मारतो आहे. त्याच्या हाकेचे प्रतिध्वनि माझ्या अंतःकरणांत निनादत असतील. आणि ते ध्वनि नाड्यांच्या तारा-यंत्रांतून तुम्हाला कळत असतील. शरद्ला अजून वाटतं की--शरद्, झाला तुझा भ्रम दूर. सांग कुंदाला, मी तिला मला विसरायला कां म्हटलं होतं तें. सांग तिला, माझा संसर्ग विषारी कां होता तें. म्हणजे तिचा राग दूर होईल.

आई : अनिरुद्ध, कुंदा तुमच्यावर रागावली नाही. ती तुमच्यावर कधीतरी रागावेल कां ? पहा, निरोप कळल्याबरोबर ती धावत आली तुमच्या भेटीला. आता शांत व्हा पाहूं तुम्ही.

अनिरुद्ध : आई, तुम्हीहि अशा अवेळीं धावत आलां माझ्याकरता ?

आई : आम्ही सगळेजण आहोंत तुमच्या प्रकृतीची काळजी करायला. तुम्ही बिलकूल फिकीर करूं नका. तुम्हाला जरा बरं वाटूं दे म्हणजे मग हवा पालटायला नेऊं.

अनिरुद्ध : हवा पालटायला ? अं हं, हवेच्या पलीकडे जायचंय् मला. पलीकडच्या जगांत. ज्या दैवी शक्तीनं मला शाप दिला तिला विचारायचं आहे मला की मी तुझं असं काय बिघडवलं होतं ? माझ्या सदिच्छांनी दुसऱ्यावर आघात व्हावा असं कां घडलं ? कुंदा--

(कुंदा रडक्या आवाजांत 'आई !' म्हणते व आईला बिलगते.)

अनिरुद्ध : काका, तो ग्रंथ अखेर अपुराच राहिला. तो पुरा झाला असता तर माझं जीवित फुकट गेलं असं नसतं वाटलं मला. माझ्याजवळ जगाला देण्यालायक जें होतं तें न देतां—

आई : कुंदानं सगळं समजावून घेतलं आहे. तुम्ही अगदी स्वस्थ बसलांत तरी ती करून देईल तुमचं काम. तुम्ही नका करूं त्याची फिकीर.

अनिरुद्ध : आनंद, देशाच्या स्वातंत्र्याकरता व उत्कर्षाकरता आपण कितीतरी योजना आखत होतों. स्वातंत्र्याच्या इतिहासांत एक पान मी लिहिणार होतों. तें आता कोरं राहील—आणि कोरं म्हणून तें पान कुणी इतिहासांत राहूहि देणार नाही. आनंद, तुझ्या सुद्धा डोळ्यांत पाणी आलं? (शून्य नजरेने पाहूं लागतो.)

कुंदा : अनिरुद्ध—

काका : (पुनः नाडी हातांत घेऊन तपासतात. नंतर स्टेथास्कोप लावतात.) अनिरुद्ध, तुम्ही आता बोलूं नका पाहूं. अगदी स्वस्थ पडा.

अनिरुद्ध : आणखी थोडया वेळानं काका. (जरा वेळ डोळे मिटून स्वस्थ पडतो.) कुंदाला तुम्हीच धीर द्या काका. शाप मला होता पण माझ्यामुळं तिला भोवला. (पुनः डोळे मिटून स्वस्थ पडतो. आणि कांही वेळानं अंगांत शक्ति आल्यासारखं दाखवतो.) आता थोडीशी शक्ति आली काका. (काका हातात नाडी धरून बसतात.) एक स्वप्न मला वारंवार पडे. पुन: पडलं तें स्वप्न! आई गेली. तात्या गेले—आमची ती जुनी इमारत किती निर्मनुष्य आणि भकास झाली! सगळी दारं सताड उघडीं पडलीं. वारा सैतानासारखा थैमान घालतो. प्रकाश अगदी अंधुक घरांत गेलों सगळं भकास. तिसऱ्या मजल्यावरच्या गच्चीवर गेलों. तिथल्या तुळशीवृंदावनात आजोबांच्या

अस्थि होत्या. आजोबांच्या भुतानं खूप थैमान घातलं. पण आता शांत. गच्चीच्या टोकाशीं गेलों. भान न राहून मी उडी घेतली. पण कुठे? कुणास माहित--खाली कांहीच नव्हतं. समोर दुधाचा सागर पसरलेला. त्या सागरापलीकडे तो पहा तेजोगोल-तिथं जायचं आहे मला. त्याच्याशीं एकरूप व्हायचं आहे. (भ्रमिष्टासारखी नजर करून कुंदाकडे पाहतो.) त्या सागरावर ती यक्षिणी फिरते आहे. जातों मी सागरापलीकडे. त्या तेजोगोलावर थांबेन मी. (डोळे मिटतो व शरीर हळूहळू खचत जातें. काका 'आटोपला ग्रंथ' ह्या अर्थी मानेने खुणावतात.) कुंदा--

आनंद : कुंदाताई, चालला अनिरुद्ध. आपल्याला टाकून गेला. शरद्— (गहिवरतो.)

[अनिरुद्धाचा प्राण जातो व शरीर एकदम निश्चल होतें.]

कुंदा : (अनिरुद्धाजवळ जाऊन) अनिरुद्ध—अनिरुद्ध! (आईला पुनः घट्ट बिलगून) आईऽ—

लेखनकाल

१९ ऑगस्ट् १९४१ ते २९ ऑगस्ट् १९४१.